शंकर ह्मणाले :– पार्वति, रामचंद्र त्या स्थलीं एक दिवस राहिला, व - दुसरे दिवशीं - सकाळीं स्नान करून, मुनींचा निरोप घेऊन, पुढें जाण्यास सिद्ध झाला. ॥ १ ॥ - निघतांना तो मुनींला ह्मणाला :- 'मुने, दंडकारण्यांत मुनींचे अनेक समुदाय राहतात; ह्मणून त्या स्थानाला फारच रमणीयता आली आहे, - असें ऐकितों. - आह्मी तिकडे जाण्याचा विचार योजिला आहे; त्याला आपलें अनुमोदन असावें. ॥ २ ॥ तसेंच, आह्मांला मार्ग दाखवून देण्याबद्दल शिष्यांना आज्ञा द्यावी.' त्या परमप्रसिद्ध अत्रिमुनींना रामाचें हें भाषण ऐकून हांसूं आलें. ते रघुवीराला ह्मणाले :– 'बा आनंददायका रामा, देवांना देखील आश्रय तुझा आहे. ॥ ३ ॥ सर्व जनांना मार्ग दाखविणारा तूं; तुला रस्ता दाखवून देणारा जगांत आहे कोण? तथापि, तूं

श्रीमहादेव उवाच । अथ तत्र दिनं स्थित्वा प्रभाते रघुनन्दनः॥ स्नात्वा मुनिं स-
मामन्त्र्य प्रयाणायोपचक्रमे[2]॥ १ ॥ मुने गच्छामहे सर्वे मुनिमण्डलमण्डितम्॥ विपिनं
दण्डकं यत्र त्वमाज्ञातुमिहार्हसि॥ २ ॥ मार्गप्रदर्शनार्थाय शिष्यानाज्ञप्तुमर्हसि॥ श्रुत्वा
रामस्य वचनं प्रहस्यात्रिर्महायशाः॥ प्राह तत्र रघुश्रेष्ठं राम राम सुराश्रय ॥ ३ ॥ सर्वस्य-
मार्गद्रष्टा[6] त्वं तव को मार्गदर्शकः॥ तथापि दर्शयिष्यन्ति तव लोकानुसारिणः॥ ४ ॥

श्रीम० उ० – अथ रघुनन्दनः (मू.) – ॥ १ ॥ 'मुने सर्वे [ वयं ] यत्र मुनिमण्डलमण्डितं दण्डकं विपिनं[3], तत्र ( मू. ). ॥ २ ॥ ( पू. ).' ॥ महायशाः[4] अत्रिः रामस्यः वचनं श्रुत्वा, प्रहस्य, तत्र रघुश्रेष्ठं प्राह – '( मू. ). ॥ ३ ॥ ( पू. )? ॥ तथापि, लोकानुसारिणः[7] तव दर्शयिष्यंति.' ॥ ४ ॥

---

१ निरोप घेऊन. २ उपचक्रमे प्रारंभ करिता झाला. ३ अरण्यास. ४ मोठी कीर्ति ज्याची, असा. ५ देवांना ज्याचा आश्रय, अशा. ६ मार्ग दाखविणारा. ७ देऊन लोकांचें अनुकरण करणाऱ्या.

अ-रा-बो.
समू.सान्व.
सटिप्पण.
॥ १ ॥

अर. कां.
सर्ग १
ते पुढें चालले.

लोकांप्रमाणें अज्ञानाचें सोंग आणिलें आहेस, त्याअर्थी हे ( शिष्यांकडे बोट दाखवून ह्मणतो ) तुला मार्ग दाखवितील. ' ॥ ४ ॥ अशा प्रकारें शिष्यांना आज्ञा देऊन अत्रिमुनि स्वतां थोडेसे त्याला पोंचवायास गेले. रामानें संतोषानें त्यांना परत जाण्यास सांगितलें; तेव्हां ते परत स्वाश्रमीं आले. ॥ ५ ॥ पुढें, कमलनयन रामचंद्र कोसभर चालून गेला. त्याठिकाणीं एक मोठी नदी त्याच्या दृष्टीस पडली. तेव्हां तो अत्रींच्या शिष्यांना असें ह्मणाला :– ॥ ६ ॥ ' काय हो! नदी उतरून जाण्याला कांहीं साधन आहे कीं नाहीं ? ' ते ह्मणाले :–' रामचंद्रा, येथें चांगली दृढ नौका आहे. ॥ ७ ॥ आह्मीच क्षणमात्रांत तुह्मांला पलिकडे उतरून नेऊं. ' नंतर, मुनिकुमारांनीं सीता, रामचंद्र आणि लक्ष्मण ह्यांना नौकेंत बसवून थोड्या वेळांत नदीच्या

इति शिष्यान्समादिश्य स्वयं किंचित्तमन्वगात्॥रामेण वारितः प्रीत्या अत्रिः स्वभवनं ययौ॥५ ॥क्रोशमात्रं ततो गत्वा ददर्श महतीं नदीम् ॥ अत्रेः शिष्यानुवाचेदं रामो राजीवलोचनः॥६॥नद्याः संतरणे कश्चिदुपायो विद्यते न वा ॥ ऊचुस्ते विद्यते नौका सुदृढा रघुनंदन ॥७ ॥ तारयिष्यामहे युष्मान्वयमेव क्षणादिह ॥ ततो नावि समारोप्य सीतां राघवलक्ष्मणौ ॥ ८ ॥ क्षणात्संतारयामासुर्नदीं मुनिकुमारकाः ॥

(पू.). ॥ रामेण प्रीत्या (मू.). ॥ ५ ॥ (पू.) ददर्श. ॥ राजीवलोचनः रामः ( मू. ) उवाच – ॥ ६ ॥ (मू.)? ' ॥ ते ऊचु :– 'रघुनन्दन, सुदृढा नौका विद्यते. ॥ ७ ॥ वयं एव इह युष्मान् क्षणात् तारयिष्यामहे. ' ॥ ( मू. ) समारोप्य, ॥ ८ ॥ मुनिकुमारकाः नदीं ( पू. ); ॥

१ आज्ञा देऊन. २ पोंचवायास गेला. ३ उतरण्याविषयीं. ४ तुह्मांला.

॥ १ ॥

पलिकडे उतरविलें; व रामानें आनंदानें परत जाण्यास अनुज्ञा दिली असतां ते सर्वजण परत अत्रीच्या आ-श्रमीं गेले. ॥ ८ ॥ ९ ॥ रामलक्ष्मण पुढें चालले; तों त्यांना एक भयाण अरण्य लागलें. त्या ठिकाणीं रानमाशांचा घोंघों शब्द एकसारखा घुमत असून, अनेक प्रकारच्या श्वापदांचे समुदाय इकडून तिकडे फिरत होते; सिंह, वाघ इत्यादि हिंस्र पशूंच्या योगानें तें स्थल भयंकर झालें होतें; ॥ १० ॥ अक्राळविक्राळ स्वरूपांचे राक्षस तेथें मोठ्या प्रेमानें राहत असत; - त्यास्थळीं गेल्याबरोबर मनुष्याच्या आंगावर भीतीनें - कांटा उभा राहत असे. अशा त्या घोर अरण्यांत शिरल्यावर राम लक्ष्मणाला ह्मणाला :- ॥ ११ ॥ 'लक्ष्मणा! येथपासून तूं आतां मोठ्या दक्षतेनें माझ्या अगदीं बरोबर चालत जा.' - असें बोलून - रामानें धनुष्याला दोरी जोडिली, हातीं बाण घेतले, - आणि बोलणें पुढें चालविलें :- ॥ १२ ॥ 'लक्ष्मणा, मी पुढें

रामाभिनन्दिताः सर्वे जग्मुरत्रेरथाश्रमम् ॥९॥ तावेत्य विपिनं घोरं झिल्लीझंकारनादितम्[1]॥नानामृगगणाकीर्णं सिंहव्याघ्रादिभीषणम्॥१०॥ राक्षसैर्घोररूपैश्च सेवितं रोमहर्षणम्[2]॥प्रविश्य विपिनं घोरं रामो लक्ष्मणमब्रवीत्॥११॥इतःपरं प्रयत्नेन गन्तव्यं सहितेन मे॥धनुर्गुणेन[3] संयोज्य[4] शरानपि करे दधत्॥१२॥अग्रे यास्याम्यहं पश्चात्त्वमन्वेहि[5] धनुर्धरः॥आवयोर्मध्यगा सीता मायेवात्मपरात्मनोः[6] ॥ १३ ॥

(मू.) जग्मुः. ॥९॥ तौ (मू.) विपिनं एत्य,॥१०॥रामः (पू.) ॥ घोरं विपिनं प्रविश्य (मू.)- ॥११॥'मे सहितेन(पू.).'॥(मू.).॥१२॥'अहं (मू.)[सन्]अन्वेहि; ॥ आत्मपरात्मनोः माया इव(मू.)[अस्तु].॥१३॥

१ रानमाशांच्या शब्दांनीं घुमलेलें. २आंगावर शहारे आणणारे. ३ दोरीनें.४जोडून. ५ मागें चाल. ६ जीव आणि ईश्वर यांच्या.

सरोवरावर पोंचलीं.

चालतों; तूं हातीं धनुष्य घेऊन पाठीमागें चालत जा. व ज्याप्रमाणें जीव आणि ईश्वर ह्यांच्यामध्यें माया असते ( माया एकच पण ती जीवाच्या ठिकाणीं आश्रयत्वानें व ईश्वराच्या ठिकाणीं विषयत्वानें ह्मणजे जीवाला ईश्वराविषयीं अज्ञान, अशाप्रकारें राहते ) त्याप्रमाणें सीतेनें आपल्या दोघांच्या मध्यें चालत असावें. ॥ १३ ॥ दृष्टि चोहोंकडे असूं दे. लक्ष्मणा, तूं शत्रूंचा निग्रह करण्याच्या कार्यीं कुशल आहेस. दंडकारण्यांत राक्षसांचें फार भय, असें पूर्वीं आपल्या कानीं आलें होतें; - आज अपशकुन होत असल्यामुळें त्यासारखें कांहीं अरिष्ट येणार असें - दिसून येत आहे. ' ॥ १४ ॥ असें बोलत बोलत ते दीड योजन ( सहा कोस ) मार्ग चालून गेले. तेथें एक सरोवर त्यांच्या दृष्टीस पडलें. त्यांत कल्हारें, कमोदें, कमळें इत्यादि ॥ १५ ॥ उदकांत उद्भवणारीं पुष्पें व शीतल जल विपुल होतें. त्यामुळें तें ( सरोवर ) शोभिवंत दिसे. तीं तिघेंजणें सरोवराजवळ गेलीं व त्याचें उत्तम उदक प्राशन करून ॥ १६ ॥

चक्षुश्चारय सर्वत्र दृष्टं रक्षोभयं महत् ॥ विद्यते दण्डकारण्ये श्रुतपूर्वमरिन्दम ॥ १४ ॥ इत्येवं भाषमाणौ तौ जग्मतुः सार्धयोजनम् ॥ तत्रैका पुष्करिण्यास्ते कल्हारकुमुदोत्पलैः ॥ १५ ॥ अम्बुजैः शीतलोदेन शोभमाना ह्यदृश्यत ॥ तत्समीपमथो गत्वा पीत्वा तत्सलिलं शुभम् ॥ १६ ॥

अरिन्दम, सर्वत्र चक्षुः चारय; दण्डकारण्ये श्रुतपूर्वं दृष्टं महत् रक्षोभयं विद्यते. ' ॥ १४ ॥ ( पू. ) जग्मतुः. ॥ ( मू. ) [ युक्ता ] आस्ते, ॥ १५ ॥ ( पू. ). ॥ अथो ( मू. ) तत्सलिलं पीत्वा, ॥ १६ ॥

१ दृष्टि. २ फिरवीत अस. ३ पूर्वी ऐकलेलें. ४ शकुनांवरून दिसलेलें. ५. राक्षसांचें भय. ६ बोलणारे. ७ दीड योजन ( सहा कोस ) पर्यंत. ८ गेले. ९ तळें. १० शीतल उदकानें. ११ दिसली.

पाण्यापासून थोड्याच अंतरावर एका वृक्षाच्या छायेंत क्षणमात्र विश्रांति घेत बसलीं. इतक्यांत, एक भयंकर धिप्पाड प्राणी आपल्या आंगावर चालून येत आहे, असें त्यांना दिसून आलें. ॥ १७ ॥ त्याच्या तोंडांत लांब लांब दाढा होत्या; तो मोठ्यानें गर्जना करून प्राण्यांना भीति दाखवीत होता; त्यानें आपल्या डाव्या खांद्यावर शूळ (भाला) ठेविला असून त्याच्या अग्राला अनेक मनुष्यें अडकावून ठेविलीं होतीं; ॥ १८ ॥ अरण्यांत जें कांहीं श्वापद दिसेल, मग तो हत्ती असो, वाघ असो किंवा रेडा असो, त्याचें तो भक्षण करीत होता! रामानें आपल्या धनुष्यावर दोरी पूर्वीच चढवून ठेविली होती; तें हातीं घेऊन तो लक्ष्मणाला ह्मणाला :– ॥ १९ ॥ 'भाऊ! पहा. हा धिप्पाड राक्षस जवळ आला. हा आपल्या समोर इकडेच येत आहे.

ऊषुस्ते सलिलाभ्याशे[1] क्षणं छायामुपाश्रिताः ॥ ततो ददृशुरायान्तं महासत्त्वं भयानकम् ॥ १७ ॥ करालदंष्ट्रावदनं[5] भीषयन्तं स्वगर्जितैः ॥ वामांसे[7] न्यस्तशूलाग्रग्रथितानेकमानुषम्[8] ॥ १८ ॥ भक्षयन्तं गजव्याघ्रमहिषं वनगोचरम् ॥ ज्यारोपितं[11] धनुर्धृत्वा रामो लक्ष्मणमब्रवीत् ॥ १९ ॥ पश्य भ्रातर्महाकायो[12] राक्षसो ऽयमुपागतः ॥

(१७पू.) ऊषुः[2] ॥ ततः आयान्तं[3] भयानकं[4] ॥ (१८पू.) भीषयन्तं[6] ॥ (१८उ.) ॥ वनगोचरं[9] गजव्याघ्रमहिषं भक्षयन्तं महासत्त्वं[10] ददृशुः ॥ रामः (१९ उ.)– ॥ १७॥१८॥१९ ॥ 'भ्रातः, पश्य (पू.); ॥

१ उदकाजवळ. २ राहिले. ३ येणाऱ्या. ४ भयंकर. ५ भयंकर दाढा मुखांत आहेत ज्याच्या, अशा. ६ भिवविणाऱ्या. ७ डाव्या खांद्यावर. ८ ठेविलेल्या शूळाच्या अग्रावर अडकाविलीं अनेक माणसें ज्याच्या, अशा. ९ वनांत दिसणाऱ्या. १० महाशक्तिमान् प्राण्याला. ११ दोरी चढविलेलें. १२ प्रचंड शरीराचा.

ह्याला पाहून भित्र्यांना भीति वाटावयाची ! ॥ २० ॥ तूं धनुष्य सज्ज करून उभा राहा. जानकि, भिऊं नकोस.' असें बोलून व बाण हातीं घेऊन राम पर्वताप्रमाणें निश्चल उभा राहिला. ॥ २१ ॥ त्या वेळीं तो राक्षस तर रामाला, लक्ष्मणाला व जानकीला पाहून मोठमोठ्यानें हांसूं लागला आणि त्यांना भीति घालीत असें बोलला :– ॥ २२ ॥ 'अरे! तुह्मी दोघेजण कोण आहां ? तुमच्या शरीरावर बाण, भाते, जटा आणि वल्कलें दिसत आहेत; तुह्मी लहान असून मुनींचा वेष घेतला आहे; तुमच्याबरोबर एक स्त्री आहे; - आकृतीवरून तर - तुह्मी फार उन्मत्त दिसतां. ॥ २३ ॥ दिसण्यांत सुंदर आहां खरे; पण मला तुह्मी माझ्या तोंडांत आपोआप येऊन पडलेल्या घांसाप्रमाणें वाटतां. अरे ! ह्या घोर अरण्यांत घातकी पशु राहतात; तुह्मी

आयात्यभिमुखं नोऽग्रे भीरूणां[1] भयमावहन् ॥ २० ॥ सज्जीकृतधनुस्तिष्ठ मा भैर्[2]जनकनन्दिनि ॥ इत्युक्त्वा बाणमादाय स्थितो राम इवाचलः[3] ॥ २१ ॥ स तु दृष्ट्वा रमानाथं लक्ष्मणं जानकीं तदा ॥ अट्टहासं ततः कृत्वा भीषयन्निदमब्रवीत् ॥ २२ ॥ कौ युवां बाणतूणीरजटावल्कलधारिणौ ॥ मुनिवेषधरौ बालौ स्त्रीसहायौ सुदुर्मदौ ॥ २३ ॥ सुन्दरौ बत मे [4]वक्त्रप्रविष्टकवलोपमौ ॥ किमर्थमागतौ घोरं वनं [5]व्यालनिषेवितम् ॥ २४ ॥

(मू.) नः अभिमुखं आयाति. ॥ २० ॥ (पू.) ॥ मा 'भैः.' ॥ (मू.) इव स्थितः. ॥ २१ ॥ सः तु तदा (पू.) दृष्ट्वा ॥ (मू.) – ॥ २२ ॥ '(मू.) युवां कौ ? ॥ २३ ॥ (मू.) वनं किमर्थं आगतौ ?' ॥ २४ ॥

१ भित्र्यांना. २ भिऊं. ३ पर्वत. ४ मुखांत शिरलेल्या घांसासारखे. ५ सर्पासारख्या दुष्ट प्राण्यांनीं सेविलेल्या.

येथें आलां कशासाठीं ?' ॥२४॥ हें राक्षसाचें भाषण ऐकून राम हांसत हांसत त्याला म्हणाला :–' अरे ! मी राम. हा माझा प्रिय बंधु लक्ष्मण. ॥ २५ ॥ आणि ही माझी प्राणप्रिया सीता. आह्मी पित्याची आज्ञा मान्य करून तुमच्यासारख्या दुष्टांना शिक्षा करण्यासाठीं येथें आलों आहों.' ॥ २६ ॥ हें रामाचें भाषण ऐकिल्याबरोबर तो राक्षस मोठ्यानें खो खो हांसूं लागला, व 'आ' करून आणि लगबगीनें शूळ हातीं घेऊन - रामाला ह्मणाला :- ॥ २७ ॥ ' रामा ! काय ? मी विराध ह्मणजे सर्व जगांत प्रख्यात ! आणि तूं मला ओळखत नाहींस ? अरे ! माझ्या भीतीनें तर सर्व मुनि वन सोडून येथून चालते झाले ! ॥ २८ ॥ आतां, तुह्मांला जर जिवंत राहण्याची इच्छा असेल, तर आयुधें टाकून, सीतेला सोडून पळून जा. नाहीं

श्रुत्वा रक्षोवचो रामः स्मयमा[1]न उवाच तम् ॥ अहं रामस्त्वयं भ्राता लक्ष्मणो मम संमतः ॥ २५ ॥ एषा सीता मम प्राणवल्लभा वयमागताः ॥ पितृवाक्यं पुरस्कृत्य शिक्षणार्थं भवादृशाम् ॥२६॥ श्रुत्वा तद्रामवचनमट्टहासमथाकरोत् ॥ व्यादाय[2] वक्त्रं बाहुभ्यां शूलमादाय सत्वरः ॥ २७ ॥ मां न जानासि राम त्वं विराधं लोकविश्रुतम् ॥ मद्भयान्मुनयः सर्वे त्यक्त्वा वनमितो गताः ॥ २८ ॥ यदि जीवितुमिच्छाऽस्ति त्यक्त्वा सीतां निरायुधौ ॥

रामः रक्षोवचः (पू.) उवाच – ॥ ' (मू.) भ्राता. ॥ २५ ॥ ( मू. ) शिक्षणार्थं आगताः.' ॥ २६ ॥ तत् रामवचनं ( पू. ) ॥ वक्त्रं (मू.) [आह]– ॥२७॥ 'राम, त्वं लोकविश्रुतं विराधं ( पू. )? ॥ सर्वे मुनयः मद्भयात् वनं त्यक्त्वा ( मू. ). ॥ २८ ॥ (पू.) त्यक्त्वा निरायुधौ [सन्तौ] ॥

१ किंचित् हांसणारा. २ पसरून.

तर मी तुम्हा दोघांनाही आतांच्या आतां खाऊन टाकीन.' ॥ २९ ॥ असें बोलून तो राक्षस सीतेला धरण्या-साठीं तिच्या आंगावर धांवला. रामानें हांसत हांसतच बाणाच्या योगानें त्याचे बाहू तोडून टाकिले. ॥३०॥ तेव्हां त्याचें मन क्रोधानें व्याप्त होऊन गेलें. तो आपलें अक्राळविक्राळ मुख पसरून रामावर चालून आला. विराध धांवून येत आहे, इतक्यांत रामानें त्याचे दोन्ही पाय तोडिले! तो एक अद्भुतच प्रकार झाला! ॥ ३१ ॥ ३२ ॥ नंतर, तो राक्षस सर्पाप्रमाणें रामाला ग्रासून टाकण्यासाठीं सरकत येऊं लागला; तेव्हां रामानें अर्धचंद्राकार बाणानें त्याचें प्रचंड मस्तक ॥ ३३ ॥ तोडून टाकिलें. तें रक्ताच्या प्रवाहासह पृथ्वीत-

पला[1]यतं न चेच्छीघ्रं भक्षयामि युवामहम् ॥ २९॥ इत्युक्त्वा राक्षसः सीतामाद[2]तुमभि-दु[3]द्रुवे ॥रामश्चिच्छेद तद्बाहू शरेण प्रहसन्निव ॥ ३० ॥ ततः क्रोधपरीतात्मा व्यादाय वि-कटं मुखम् ॥ राममभ्यद्रवद्रामश्चिच्छेद परिधावतः॥ ३१ ॥ पदद्वयं विराधस्य तदद्भुत-मिवाभवत् ॥ ३२ ॥ ततः सर्प इवास्[6]येन ग्रसितुं राममापतत् ॥ ततोऽर्धचन्द्राकारेण बाणेनास्य महच्छिरः ॥ ३३ ॥ चिच्छेद रुधिरौघे[7]ण पपात धरणीतले ॥ ततः सीता समालिंग्य प्रशशंस रघूत्तमम् ॥ ३४ ॥

( मू. ) भक्षयामि.' ॥ २९ ॥ ( मू. ) शरेण तद्बाहू चिच्छेद[4]. ॥ ३० ॥ ( पू. ) व्यादाय, ॥ ( ३१ उ. )परिधावतः विराधस्य पदद्वयं चिच्छेद. ( मू. ) ॥ ३१॥ ३२ ॥ (पू.) ॥ [रामः] ( मू. ) ॥३३॥ (पू.) पपात. ॥ ( मू. ) समालिङ्ग्य, प्रशशंस. ॥ ३४ ॥

१ पळा. २ धरण्यास. ३ आंगावर धांवला. ४ तोडिता झाला. ५ क्रोधानें व्यापलें मन ज्याचें, असा. ६ मुखानें. ७ रक्ताच्या प्रवाहानें.

लावर पडलें. तेव्हां सीतेनें रामचंद्राला आलिंगन देऊन त्यांची प्रशंसा केली. ॥ ३४ ॥ त्या वेळीं स्वर्गामध्यें देवगणांनीं वाजविलेल्या दुंदुभींचे शब्द निघाले, अप्सरा आनंदित होऊन नृत्य करूं लागल्या व गंधर्व आणि किन्नर गाऊं लागले. ॥ ३५ ॥ विराधाच्या शरीरापासून एक अत्यंत सुस्वरूप तेजस्वी पुरुष निघाला. त्यानें निर्मल वस्त्रें परिधान केलीं असून तापविलेल्या सुवर्णासारखे उत्तम अलंकार घातले होते; जसा आकाशांत सूर्य दिसतो, तसा तो पुरुष रामाच्या अग्रभागीं दिसूं लागला. ॥ ३६ ॥ त्यानें भक्तांचीं दुःखें दूर करणाऱ्या रामचंद्राला प्रणाम केला. - शंकर ह्मणाले :-- पार्वति, - रामचंद्र संसारप्रवाहाचा नाश करणारा होय; दयेचें केवळ उत्पत्तिस्थान असा तो प्रभु स्वतांला शरण आलेल्या जनांचीं संकटें नाहींशीं करितो.- त्याचें दर्शन होतांच - त्या पुरुषाचें मन प्रसन्न झालें व त्यानें रामचंद्राला वारंवार साष्टांग नमस्कार घातले. ॥३७॥

ततो दुन्दुभयो नेदुर्दिवि देवगणेरिताः॥ ननृतुश्चाप्सरा हृष्टा जगुर्गन्धर्वकिन्नराः ॥ ३५ ॥
विराधकायादतिभासुराकृतिर्विभ्राजमानो विमलाम्बरावृतः ॥ प्रतप्तचामीकरचारुभूषणो व्यदृश्यताग्रे गगने रविर्यथा॥ ३६ ॥ प्रणम्य रामं प्रणतार्तिहारिणं भवप्रवाहोपरमं घृणाकरम्॥ प्रणम्य भूयः प्रणनाम दण्डवत्प्रपन्नसर्वार्तिहरं प्रसन्नधीः ॥ ३७ ॥

(पू.) दुन्दुभयः नेदुः. ॥ हृष्टाः अप्सराः ननृतुः; ( मू. ) जगुः. ॥ ३५ ॥ ( मू. ) [ तथा पुरुषः ] अग्रे व्यदृश्यत. ॥ ३६ ॥ प्रसन्नधीः ( मू. ) रामं प्रणम्य प्रणम्य भूयः दण्डवत् प्रणनाम. ॥ ३७ ॥

१ स्वच्छ वस्त्रानें वेष्टिलेला. २ तापलेल्या सुवर्णाप्रमाणें चकचकीत अलंकार ज्याचे, असा. ३ ज्याचें मन प्रसन्न झालें, असा. ४ संसाराचा प्रवाह शमविणाऱ्या. ५ दया करणाऱ्या. ६ नमस्कार करिता झाला.

त्या विद्याधराची मागणी.

विराध ह्मणाला :–'श्रीरामा, हे कमलपत्रविशालाक्षा, तुझ्या पुढें उभा असलेला हा शुद्ध तेजस्वी पुरुष मी विद्याधर आहें. कारणाशिवाय क्रुद्ध होणारे प्रत्यक्ष कोपमूर्ति जे दुर्वास ऋषि, त्यांनीं मला पूर्वीं शाप दिला होता; त्या शापापासून त्वां आज मला सोडविलें. ॥३८॥ इतउत्तर, संसाराची निवृत्ति व्हावी एवढ्यासाठीं, मला तुझ्या चरणकमलाची नित्य स्मृति राहो; माझी वाणी तुझ्या नामाचें कीर्तनच करो; कानांनीं तुझें ॥ ३९ ॥ कीर्तनामृत प्राशन करीत असावें; दोन्ही हात तुझ्या चरणकमलाचें पूजनच करीत राहोत, मस्तकानें तुझ्या चरणयुगुलाला प्रणाम करावें; अशा रीतीनें माझीं सर्व इंद्रियें तुझी सेवा करण्यांत तत्पर असोत. ॥ ४० ॥ हे षड्गुणैश्वर्यसंपन्न रामा, शुद्ध अपरोक्षज्ञान ही तुझी मूर्ति होय; तूं नित्य स्वस्वरूपीं रममाण असतोस, व

विराध उवाच । श्रीराम राजीवदलायताक्ष विद्याधरो ऽहं विमलप्रकाशः ॥ दुर्वाससा ऽकारणकोपमूर्तिना शप्तः पुरा सो ऽद्य विमोचितस्त्वया ॥ ३८॥ इतः परं त्वच्चरणारविन्दयोः स्मृतिः सदा मे ऽस्तु भवोपशान्तये ॥ त्वन्नामसंकीर्तनमेव वाणी करोतु मे कर्णपुटं त्वदीयम्॥३९॥ कथामृतं पातु करद्वयं ते पादारविन्दार्चनमेव कुर्यात् ॥ शिरश्च ते पादयुगप्रणामं करोतु नित्यं भवदीयमेवम्॥४०॥नमस्तुभ्यं भगवते विशुद्धज्ञानमूर्तये ॥ आत्मारामाय रामाय सीतारामाय वेधसे ॥ ४१ ॥

वि० उ० – ' (पू.) विद्याधरः अहं ॥ पुरा [1]अकारणकोपमूर्तिना (पू.) विमोचितः. ॥ ३८ ॥ (पू.) अस्तु. ॥ मे वाणी नित्यं,( बा.३९।४० मू. ) एवं [ मदङ्गजातं ] भवदीयं एव [ अस्तु. ] ॥ ३९ ॥ ॥ ४० ॥ ( मू. ) तुभ्यं नमः. ॥ ४१ ॥

१ कारणावांचून येणारा मूर्तिमान् क्रोध. २ पातु=पिबतु प्राशन करो.

भक्तजनांना आनंद देतोस; तसेंच, तूं इच्छेस येईल, त्याप्रमाणें घटना करण्यास समर्थ आहेस. हे सीतारामा, तुला नमस्कार असो. ॥४१॥ रामचंद्रा, मी तुला शरण आलों आहें; माझें रक्षण कर. तूं आज्ञा दिलीस कीं मी देवलोकीं जाईन. हे रघुवीरा, तुझ्या मायेनें मला मोह घालूं नये, - एवढी कृपा करण्याबद्दल माझी तुजपाशीं प्रार्थना आहे. -' ॥ ४२ ॥ अशा प्रकारें त्या पुरुषानें विज्ञापना केली; तेव्हां रामचंद्र प्रसन्न झाला. त्या वेळीं त्या परमोदार ईश्वरानें संतुष्ट होऊन विराधाला वर दिला - आणि सांगितलें :- ॥ ४३ ॥ 'विद्याधरा, जा. लोकांमध्यें अज्ञानाच्या दोषामुळें जे परिणाम दिसून येतात, ते त्वां माझ्या दर्शनाच्या योगानें जिंकून टाकिले. ह्मणून आतां तूं ज्ञानी लोकांत श्रेष्ठ अर्थात मुक्त होशील. ॥ ४४ ॥ लोकामध्यें माझी भक्ति

प्रपन्नं पाहि मां राम यास्यामि त्वदनुज्ञया ॥देवलोकं रघुश्रेष्ठ माया मां मा वृणोतु ते ॥४२॥ इति विज्ञापितस्तेन प्रसन्नो रघुनन्दनः ॥ ददौ वरं तदा प्रीतो विराधाय महामतिः ॥ ४३ ॥ गच्छ विद्याधराशेषमायादोषगुणा जिताः ॥ त्वया मद्दर्शनात्सद्यो मुक्तो ज्ञानवतां वरः ॥४४॥ मद्भक्तिर्दुर्लभा लोके जाता चेन्मुक्तिदा यतः ॥ अतस्त्वं भक्तिसंपन्नः परं याहि ममाज्ञया ॥ ४५ ॥

राम, प्रपन्नं मां पाहि. रघुश्रेष्ठ, देवलोकं त्वदनुज्ञया यास्यामि. ते ( मू. ). ' ॥ ४२ ॥ तदा तेन (मू.) रघुनन्दनः प्रीतः [सन्] विराधाय वरं ददौ -- ॥ ४३ ॥ ' विद्याधर, गच्छ; त्वया मद्दर्शनात् (मू.); ॥ ज्ञानवतां वरः [भूत्वा,] (मू.) [भविष्यसि].॥४४॥ यतः लोके दुर्लभा (मू.)परं याहि.'॥४५॥

१ आच्छादून टाकों.

फार दुर्मिळ आहे. ती उत्पन्न झाली कीं मुक्ति प्राप्त होतेच. ह्मणून, तुझी मजवर भक्ति जडली, त्याअर्थी माझ्या आज्ञेस्तव तुला मोक्ष प्राप्त होईल.' ॥४५॥ रामचंद्रानें अत्यंत भयंकर राक्षसाचा वध केला, त्याला शापापासून मुक्त करून वर दिला; शेवटीं त्या राक्षसाला पुन्हां विद्याधर पदवी मिळाली : अशा प्रकारें रामाच्या चरित्राचें जो वर्णन करितो, त्या पुरुषाला, सकल पुरुषार्थांची प्राप्ति होते. ॥ ४६ ॥ इति प्रथमः सर्गः ॥१॥

विराध स्वर्गाला गेला असतां, लक्ष्मण आणि सीता ह्या दोघांना बरोबर घेऊन रामचंद्र शरभंगाच्या अरण्यांत गेला. तें स्थान सर्व प्राण्यांना सुखदायक होतें ॥ १ ॥ त्यावेळीं महाबुद्धिमान् शरभंग मुनि, लक्ष्म-

रामेण रक्षोनिधनं सुघोरं शापाद्विमुक्तिर्वरदानमेवम् ॥ विद्याधरत्वं पुनरेव लब्धं रामं गृणन्नेति नरो ऽखिलार्थान् ॥ ४६ ॥ इति श्रीम० रा० उ० अरण्यकाण्डे प्रथमः सर्गः ॥१॥ विराधे स्वर्गते रामो लक्ष्मणेन च सीतया ॥ जगाम शरभंगस्य वनं सर्वसुखावहम् ॥१ ॥ शरभंगस्ततो दृष्ट्वा रामं सौमित्रिणा सह ॥ आयातं सीतया सार्धं संभ्रमादुत्थितः सुधीः ॥ २ ॥

रामेण सुघोरं (पू.) वरदानं [ कृतम् ]. ॥ ( मू. ) एँति. ॥ ४६ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणान्वये अरण्यकाण्डे प्रथमः सर्गः ॥ १ ॥ (पू.) च [सह] ॥ सर्वसुखावहं ( मू. ) जगाम. ॥ १ ॥ ततः सुधीः शरभङ्गः. (मू.) रामं दृष्ट्वा, संभ्रमात् उत्थितः. ॥ २ ॥

१ राक्षसाच्या नाशाप्रत. २ वर्णन करणारा. ३ सर्व इच्छित वस्तूंस. ४ पावतो. ५ स्वः गते स्वर्गाला गेला असतां.

णासहवर्तमान राम सीतेला बरोबर घेऊन आला आहे असें पाहून, लगबगीनें उठला. ॥ २ ॥ त्यानें सामोरा जाऊन तिघांनाही बहुमानपुरस्सर आश्रमीं आणिलें व आसनांवर बसवून कंद, मुळें फळें इत्यादिकांच्यायोगानें त्यांचें आदरातिथ्य केलें. ॥ ३ ॥ पुढें शरभंगऋषि आनंदानें त्या भक्तपरायण रामचंद्राला ह्मणाला :– ‘ रामा, मी तप करण्याचा निश्चय करून फार दिवस येथेंच राहिलों आहें. ॥ ४ ॥ मला तुझें दर्शन घडावें अशी फार इच्छा होती; - ती आज पूर्ण झाली. - रामचंद्रा, तूं प्रत्यक्ष परमेश्वर आहेस. आज माझी तपश्चर्या फळास आली. आतां मीं जें पुष्कळ पुण्य संपादन केलें आहे तें सर्व तुला अर्पण करितों, आणि नंतर मोक्षास जातों.' ॥५॥ - शंकर ह्मणाले :– पार्वति, - शरभंग मुनि पूर्ण योगी व

अभिगम्य सुसंपूज्य विष्टरेषूपवेशयत् ॥ आतिथ्यमकरोत्तेषां कन्दमूलफलादिभिः ॥ ३ ॥ प्रीत्याऽऽह शरभंगोऽपि रामं भक्तपरायणम् ॥ बहुकालमिहैवासं तपसे कृतनिश्चयः ॥ ४ ॥ तव संदर्शनाकांक्षी राम त्वं परमेश्वरः ॥अद्य मत्तपसा सिद्धं यत्पुण्यं बहु विद्यते ॥तत्सर्वं तव दास्यामि ततो मुक्तिं व्रजाम्यहम् ॥५॥ समर्प्य रामस्य महत्सुपुण्यफलं विरक्तः शरभंगयोगी ॥ चितिं समारोहयदप्रमेयं रामं ससीतं सहसा प्रणम्य ॥ ६ ॥

(मू.) आतिथ्यं अकरोत्. ॥ ३ ॥ ( पू. ) रामं प्रीत्या आह – ॥‘ ( ४ उ. ) ॥ अहं ( मू. ). ’ ॥ ४ ॥ ५ ॥ विरक्तः शरभङ्गयोगी (पू.) समर्प्य, ॥ ( मू. ) चितिं समारोहयत्. ॥ ६ ॥

१ विष्टरेषु आसनांवर. २ उपवेशयत् बसविता झाला. ३ देईन. ४ जातों. ५ समारोहत् चढला.

अ-रा-श्री-
सधू.सान्व.
सो टण्पग.
॥ ७ ॥

अर. का.
सर्ग २
' राम परम
दयालु. '

विरक्त होता. त्यानें आपलें अपार पुण्यफल रामाला अर्पण केलें, ज्याच्या स्वरूपाला इयत्ता नाहीं त्या सीतेसह प्रभु रामचंद्राला प्रणाम केला, आणि तत्काल चितेवर आरोहण केलें. ॥ ६ ॥ ह्यावेळीं त्यानें एकसारखें रामाचें ध्यान चालविलें होतें. रामचंद्र अखिल प्राण्यांच्या हृदयीं वास करितो; त्याचें शरीर दूर्वेच्या पत्राप्रमाणें श्यामवर्ण असून, नेत्र कमलासारखे होते; त्यानें वल्कलरूपी वस्त्र धारण केलें होतें; त्याच्या मस्तकावर तेजस्वी जटांचा मुकुट दिसत होता. सीता व लक्ष्मण हीं दोघें त्याच्याजवळ होतीं. ॥ ७ ॥ - देहत्याग करितांना शरभंगानें स्तुतिपूर्वक रामाची प्रार्थना केली, ती अशी :- ' जगामध्यें रामचंद्रासारखा दुसरा दयाळू पुरुष कोणी तरी सांपडेल काय ? स्मरण केलें असतां, हा कामधेनूप्रमाणें - भक्तांचे इच्छित अर्थ पुरवितो. - मी अनन्य भावानें त्याचें नित्य चिंतन करीत आलों. तें स्मरण जाणून त्या प्रभूनें मला प्रत्यक्ष दर्शन दिलें. ॥ ८ ॥ देवाधिदेव दाशरथि प्रभु रामचंद्रानें आतां येथें पाहत राहावें. मी स्वतांचा देह दहन करून नि-

ध्यायंश्चिरं राममशेषहृत्स्थं दूर्वादलश्यामलमम्बुजाक्षम् ॥ चीराम्बरं स्निग्धजटाकलापं सीतासहायं सहलक्ष्मणं तम् ॥ ७ ॥ को वा दयालुः स्मृतकामधेनुरन्यो जगत्यां रघुनायकादहो ॥ स्मृतो मया नित्यमनन्यभाजा ज्ञात्वा स्मृतिं मे स्वयमेव यातः ॥ ८ ॥ पश्यत्विदानीं देवेशो रामो दाशरथिः प्रभुः ॥

( मू. ) रामं चिरं ध्यायन् [सन् आह] - ॥७॥ 'अहो ! जगत्यां रघुनायकात् अन्यः स्मृतकामधेनुः दयालुः कः वा: ? ॥ अनन्यभाजा मया नित्यं स्मृतः ज्ञात्वा मे (मू.); ॥ ८ ॥ (पू.) रामः पश्यतु. ॥ ॥ ७ ॥

१ स्मरण केला असतां कामधेनूसारखा ( इच्छा पुरविणारा ). २ इतराला न भजणारा, अशा.

ष्पाप होत्साता ब्रह्मलोकास जातों. ॥ ९ ॥ मेघावर विद्युल्लता असते, त्याप्रमाणें ज्याच्या वामांकावर सीता बसली आहे, तो अयोध्येचा अधिपति रघुवीर सदासर्वकाळ माझ्या हृदयीं असो.' ॥ १० ॥ शरभंग मुनीनें असें - ह्मणून - रामचंद्राचें पुष्कळ वेळ ध्यान केलें, पुढें उभ्या असलेल्या मूर्तीचें दर्शन घेतलें, अग्नि पेटविला व लागलेंच आपलें पंचभूतात्मक शरीर जाळून टाकिलें. ॥ ११ ॥ तों तो दिव्य-देहधारी होऊन साक्षात् लोकसंरक्षक प्रभूच्या पदास प्राप्त झाला पुढें दंडकारण्यांत राहणारे सर्व मुनिजन रामचंद्राचें दर्शन घेण्यासाठीं त्या शरभंगाच्या आश्रमीं येऊन पोंचले. ॥ १२ ॥ सीता, राम

दग्ध्वा स्वदेहं गच्छामि ब्रह्मलोकमकल्मषः॥ ९ ॥ अयोध्याधिपतिर्मे ऽस्तु हृदये राघवः सदा ॥ यद्वामांके स्थिता सीता मेघस्येव तडिल्लता[2] ॥ १०॥ इति रामं चिरं ध्यात्वा दृष्ट्वा च पुरतः स्थितम् ॥ प्रज्वाल्य[3] सहसा वह्निं दग्ध्वा पञ्चात्मकं[4] वपुः[5] ॥ ११ ॥ दिव्यदेहधरः साक्षाद्ययौ लोकपतेः पदम् ॥ ततो मुनिगणाः सर्वे दण्डकारण्यवासिनः ॥ आजग्मू राघवं द्रष्टुं शरभंगनिवेशनम्[6]॥ १२॥ दृष्ट्वा मुनिसमूहं तं जानकीरामलक्ष्मणाः॥

अकल्मषः [ अहं ] स्वदेहं दग्ध्वा ब्रह्मलोकं गच्छामि. ॥ ९ ॥ (पू.) मे हृदये अस्तु, ॥ ( मू. ) इव स्थिता.' ॥ १० ॥ (पू.), दृष्ट्वा, ॥ सहसा वन्हि ( मू. ) दग्ध्वा, ॥ ११ ॥ (पू.) ययौ. ॥ (द्वि. अ.) मुनिगणाः ॥(मू.) आजग्मुः. ॥ १२ ॥ मायामानुषरूपिणः जानकीरामलक्ष्मणाः तं मुनिसमूहं (मू.) ॥

१ जाळून. २ विद्युल्लता. ३ पेटवून. ४ पांच भूतें ( पृथ्वी, उदक, तेज, वायु, आकाश ) हींच ज्याचें स्वरूप, अशा. ५ शरीराला. ६ शरभंगाच्या आश्रमास.

आणि लक्ष्मण ह्यांनीं मायेनें मनुष्यांचीं रूपें धारण केलीं होतीं; त्यांनीं त्या मुनींच्या समुदायास अवलोकन करून तत्काल भूमीवर नमस्कार केले. ॥ १३ ॥ रामचंद्र सर्व प्राण्यांच्या अंतरीं वास करितो; त्यानें भक्तांचीं दुःखें हरण करण्यासाठीं सध्यां धनुष्यबाण हातीं घेतले होते. मुनींनीं त्याला आशीर्वाद देऊन गौरविलें व हात जोडून ह्मटलें :— ॥ १४ ॥ 'रामचंद्रा, ब्रह्मदेवानें भूमीचा भार दूर करण्यासाठीं प्रार्थना केली ह्मणून तूं येथें अवतार घेतलास. आह्मी जाणतों कीं, तूं प्रत्यक्ष विष्णु, जानकी लक्ष्मी, तसाच लक्ष्मण ॥ १५ ॥ शेषाचा अंश, व भरत आणि शत्रुघ्न दोघे शंखचक्रांचे अवतार होत. ह्मणून आतां आगोदर तूं ऋषींची दुःखापासून मुक्तता करावीस. ॥ १६ ॥ रामचंद्रा, लक्ष्मण आणि सीता ह्यांना घेऊन आह्मांबरोबर चल. मुनि

प्रणेमुः सहसा भूमौ मायामानुषरूपिणः ॥ १३ ॥ आशीर्भिरभिनन्द्याथ रामं सर्वहृदिस्थितम् ॥ ऊचुः प्राञ्जलयः सर्वे धनुर्बाणधरं हरिम् ॥ १४ ॥ भूमेर्भारावताराय जातोऽसि ब्रह्मणाऽर्थितः ॥ जानीमस्त्वां हरिं लक्ष्मीं जानकीं लक्ष्मणं तथा ॥ १५ ॥ शेषांशं शंखचक्रे द्वे भरतं सानुजं तथा ॥ अतश्चादौ ऋषीणां त्वं दुःखं मोक्तुमिहार्हसि॥ १६॥आगच्छ यामो मुनिसेवितानि वनानि सर्वाणि रघूत्तम क्रमात्॥

(बा.मू.) प्रणेमुः. ॥१३॥ अथ सर्वे प्राञ्जलयः [सन्तः] (मू.) रामं आशीर्भिः अभिनन्द्य ऊचुः — ॥ १४ ॥ 'त्वं (पू.) [सन] जातः असि; ॥ (१५ उ. १६ पू.) जानीमः ॥ (मू.). ॥१५॥१६॥ रघूत्तम, सुमित्रासुतजानकीभ्यां [सह] (पू.) वनानि क्रमात् द्रष्टुं यामः.

१ जाणतों. २ मोक्तुं सोढविण्यास.

ज्या ठिकाणीं राहतात तीं सर्व आश्रमस्थलें आपण क्रमाक्रमानें पाहण्यास जाऊं. तीं पाहिलींस ह्मणजे तुझें आह्मांवरील प्रेम दृढ होईल.' ॥ १७ ॥ अशा प्रकारें ऋषींनीं हात जोडून रामचंद्राची प्रार्थना केली; तेव्हां तो सर्वव्यापी ईश्वर मुनींचीं वनें पाहण्याकारितां त्या ऋषींबरोबर गेला. ॥ १८ ॥ त्याठिकाणीं चोहोंकडे पडलेल्या अनेक मस्तकांच्या कंवट्या (हाडें) रामाच्या दृष्टीस पडल्या. तेव्हां त्यानें ऋषींना विचारिलें :— ॥ १९ ॥ 'मुनिहो! हीं हाडें कोणाचीं व येथें कां पडलीं आहेत?' मुनींनीं त्याला सांगितलें:—'रामा! हीं ऋषींचीं मस्तकें! ॥ २० ॥ ईश्वरा! - जोंपर्यंत ऋषि समाधि लावून बसले असतील तोंपर्यंत ईश्वररूप बनलेले

द्रष्टुं सुमित्रासुतजानकीभ्यां तदा दयाऽस्मासु दृढा भविष्यति ॥ १७ ॥ इति विज्ञापितो रामः कृताञ्जलिपुटैर्विभुः ॥ जगाम मुनिभिः सार्धं द्रष्टुं मुनिवनानि सः ॥ १८ ॥ ददर्श तत्र पतितान्यनेकानि शिरांसि सः ॥ अस्थिभूतानि सर्वत्र रामो वचनमब्रवीत् ॥ १९ ॥ अस्थीनि केषामेतानि किमर्थं पतितानि वै ॥ तमूचुर्मुनयो राम ऋषीणां मस्तकानि हि ॥ २० ॥ राक्षसैर्भक्षितानीश प्रमत्तानां समाधितः ॥ अन्तरायं मुनीनां ते पश्यन्तोऽनुचरन्ति हि ॥ २१ ॥

(बा. मू.).' ॥ १७ ॥ इति विज्ञापितः विभुः सः रामः (मू.) द्रष्टुं जगाम. ॥ १८ ॥ तत्र सः रामः अस्थिभूतानि सर्वत्र (पू.) ददर्श, (मू.) — ॥ १९ ॥ 'एतानि (पू.)?' ॥ मुनयः तं ऊचुः — (२० उ. २१ पू.), हि ते समाधितः प्रमत्तानां मुनीनां (मू.)!' ॥ २० ॥ २१ ॥

१ आह्मांवर. २ केले अंजलिपुट ज्यांनीं, अशा. ३ भ्रष्ट झालेल्या. ४ विघ्नाप्रत. ५ मागून फिरतात.

राक्षसवधाची प्रतिज्ञा.

असतात; ह्मणून त्या वेळीं त्यांच्यापुढें राक्षसांचें कांहीं चालत नाहीं. पण - त्यांनीं आपला समाधि उतरला कीं, राक्षस त्यांना खाऊन टाकितात; - अशा प्रकारें राक्षसांनीं आजपर्यंत अनेक ऋषि खाल्ले, - त्यांचीं हीं हाडें पडलीं आहेत ' येथें राक्षस, ऋषींच्या कर्मानुष्ठानांत व्यंग पडत आहे कोठें, अशी वाट पाहत एकसारखे त्यांच्या आसपास घिरट्या घालीत असतात ! ' ॥ २१ ॥ मुनींच्या भाषणावरून त्यांचें भय आणि दैन्य - उघड होत - होतें. तें ऐकिल्याबरोबर रामानें सर्व राक्षसांचा वध करण्याबद्दल प्रतिज्ञा केली. ॥ २२ ॥ पुढें, सीता आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान राम त्या ठिकाणीं कित्येक वर्षें राहिला. वनांत राहणारे मुनि त्याची नित्य पूजा करीत. प्रभु रामचंद्रानें क्रमाक्रमानें तेथील सर्व ऋषींचे आश्रम पाहिले. ॥ २३ ॥ २४ ॥ पुढें, तो सुतीक्ष्ण मुनींच्या आश्रमास गेला. ह्या सुप्रसिद्ध आश्रमांत ऋषींचा मोठा समुदाय होता. त्या स्थलीं

श्रुत्वा वाक्यं मुनीनां स भयदैन्यसमन्वितम् ॥ प्रतिज्ञामकरोद्रामो वधायाशेषरक्षसाम् ॥२२॥ पूज्यमानः सदा तत्र मुनिभिर्वनवासिभिः ॥ जानक्या सहितो रामो लक्ष्मणेन समन्वितः ॥ २३ ॥ उवास कतिचित्तत्र वर्षाणि रघुनन्दनः ॥ एवं क्रमेण संपश्यन्नृषीणामाश्रमान्विभुः ॥ २४ ॥ सुतीक्ष्णस्याश्रमं प्रागात्प्रख्यातमृषिसंकुलम् ॥

सः रामः ( पू. ) वाक्यं श्रुत्वा, अशेषरक्षसां[१] वधाय ( मू. ). ॥ २२ ॥ वनवासिभिः मुनिभिः तत्र सदा ( मू. ) ॥ २३॥ रघुनन्दनः तत्र ( पू. ) उवास. ॥ विभुः(उ.) संपश्यन [सन्] ॥२४॥ (बा.पू.) ॥ ९ ॥

१ सगळ्या राक्षसांच्या.

सर्व ऋतूंतील - फळें फुलें वगैरे वेगवेगळे - गुण नेहमीं असत; ह्मणून प्राण्यांना तेथें सर्वकाल सुख प्राप्त होत असे. ॥ २५ ॥ राम आला, असें ऐकतांच सुतीक्षण मुनि स्वतां सामोरा आला. हा मुनि अगस्त्यऋषींचा शिष्य असून राममंत्राची उपासना करण्यांत नित्य तत्पर असे. त्यानें रामाची यथाविधि पूजा केली. भक्तीमुळें त्याचे नेत्र इतके उत्कंठित झाले होते - कीं, रामाकडे कितीही वेळ पाहिलें तरी त्याला पुरे वाटेना. - ॥ २६ ॥ सुतीक्ष्ण रामाला ह्मणाला :– ' हे सीतापते, तुझ्या गुणांचा अंत नाहीं; तुझ्या स्वरूपाला देशानें किंवा कालानेंही मर्यादा नाहीं ( तुझें स्वरूप अमुक देशांत किंवा अमुक कालपर्यंत असतें असें नाहीं; तें सर्व व्यापि व नित्य आहे. ); शंकर आणि ब्रह्मदेव तुझ्या चरणाचा आश्रय करितात; तुझे चरण हीच संसार-

सर्वर्तुगुणसंपन्नं सर्वकालसुखावहम् ॥ २५ ॥ राममागतमाकर्ण्य सुतीक्ष्णः स्वयमागतः ॥ अगस्त्यशिष्यो रामस्य मन्त्रोपासनतत्परः ॥ विधिवत्पूजयामास भक्त्युत्कण्ठितलोचनः ॥ २६ ॥सुतीक्ष्ण उवाच ॥ त्वन्मन्त्रजाप्यहमनन्तगुणाप्रमेय सीतापते शिवविरिञ्चिसमाश्रितांघ्रे ॥ संसारसिन्धुतरणामलपोतपाद रामाभिराम सततं तव दासदासः ॥ २७ ॥

( बा. मू. ) सुतीक्ष्णस्य आश्रमं प्रागात् ॥ २५ ॥ ( मू. ) सुतीक्ष्णः विधिवत् पूजयामास. ॥ २६ ॥ सु० उ०– ' ( मू. ), त्वन्मन्त्रजापी अहं सततं तव दासदासः [ अस्मि. ] ॥ २७ ॥

१ तुझा नाममंत्र जपणारा. २ ज्याच्या गुणांचा अंत नाहीं, अशा. ३ ज्याच्या स्वरूपाला इयत्ता नाहीं, अशा. ४ संसाररूपी समुद्र तरून जाण्यास निर्दोष नौकारूप आहेत चरण ज्याचे अशा. ५ अभिराम मनोहरा.

'मजवर कृपा केलीस.'

रूपी समुद्र तरून जाण्याला साधन उत्तम नौका होय. तूं भक्त जनांना सर्वतोपरी आनंद देतोस. रामचंद्रा, मी तुझ्या नाममंत्राचा जप करीत असतां व इतउत्तरही नेहमीं तुझ्या भक्तांचा दास होऊन राहीन. ॥२७॥ रामा, मी तुझ्या मायेच्यायोगानें पुत्र, स्त्री, गृह ह्या अज्ञानमय कूपामध्यें बुडून गेलों आहें; हे शरीर केवळ मळाचा एक सुरेखसा गोळा होय, पण ह्याच्या मोहपाशांत माझें मन गुरफाटून गेलें आहे. देवा, तुझ्या स्वरूपाचें ज्ञान किंवा दर्शन सगळ्या भुवनांत कोणाला होत नाहीं; पण तोच तूं, माझी अशी स्थिति पाहून, स्वतां मजकडे आलास. - ह्यामुळें मी कृतार्थ झालों ! - ॥ २८ ॥ तूं सर्व प्राण्यांच्या हृदयांत वास करितोस, - अर्थात सर्वांना जवळच आहेस खरा; - पण जे लोक तुझ्या मंत्राचा जप करण्यांत विमुख असतील त्यांच्यावर तूं आपलें मायाजाल पसरितोस. तुझ्या मंत्राचें साधन करण्यांत जे तत्पर असतील त्यांच्यापासून माया दूर

मामद्य सर्वजगतामविगोचरस्त्वं त्वन्मायया सुतकलत्रगृहान्धकूपे ॥ मैग्नं निरीक्ष्य मलपुंद्गलपिण्डमोहपाशानुबद्धहृदयं स्वयमागतो ऽसि ॥ २८॥ त्वं सर्वभूतहृदयेषु कृतालयो ऽपि त्वन्मन्त्रजाप्यविमुखेषु तनोषि मायाम् ॥ त्वन्मन्त्रसाधनपरेष्वपयाति माया सेवानुरूपफलदो ऽसि यथा महीपः ॥ २९ ॥

( मू. ) मां निरीक्ष्य स्वयं आगतः असि. ! ॥ २८ ॥ (पू.) तनोषि. ॥ माया ( मू. ) [ तथा ] सेवानुरूपफलदः असि. ॥ २९ ॥

१ पुत्र, स्त्रिया, गृह ह्या अंधाऱ्या विहिरींत. २ बुडालेल्या. ३ मलरूपी सुंदर गोळ्याच्या (शरीराच्या) मोहपाशानें ज्याचें मन बांधून गेलें, अशा. ४ पाहून. ५ राजा.

होते. ज्याप्रमाणें राजा आपल्या सेवकांना त्यांनीं केलेल्या सेवेच्या महत्त्वाप्रमाणें लहान मोठें वेतन किंवा देणगी देतो, त्याप्रमाणें तूंही भक्तांना त्यांनीं केलेल्या सेवेला अनुरूप असें फळ देतोस. ॥ २९ ॥ जगाची उत्पत्ति, पालन व संहार होण्याला कारण एक तूंच आहेस. ईश्वरा, तूंच आपल्या त्रिगुणात्मक मायेच्या योगानें ब्रह्मा, शंकर व विष्णु ह्या रूपांनीं भासत असतोस. ज्याप्रमाणें सूर्य मूळचा एकच असतांना उदकाच्या अनेक भांड्यांत - प्रतिबिंबित झाला ह्मणजे - विविध रूपांचा दिसतो, त्याप्रमाणें तुझ्या मायेनें ज्यांच्या बुद्धींना मोह पडलेला असतो त्यांना तुझीं रूपें वेगवेगळीं दिसतात. ॥ ३० ॥ रामचंद्रा, तूं शुद्धसत्त्वगुणप्रधान चित्तांमध्यें वास्तव्य करितोस. आज तुझ्या चरणकमलाचें दर्शन मला घडलें, - ह्मणून मी धन्य झालों. - असत् जनांना तुझें स्वरूप कळत नाहीं; पण ज्यांचीं अंतःकरणें तुझ्या मंत्राच्या जपानें पवित्र झालीं असतात, त्यांच्या अंतरीं तूं सर्वकाळ प्रसन्न आहेस व त्यांना नित्य दर्शन देतोस. ॥ ३१ ॥

विश्वस्य सृष्टिलयसंस्थितिहेतुरेकस्त्वं मायया त्रिगुणया विधि[1]रीशविष्णू ॥ भासी[2]-
श मोहितधियां विविधाकृतिस्त्वं यद्वद्रविः सलिलपात्रगतो ह्यनेकः ॥ ३० ॥
प्रत्यक्षतो ऽद्य भवतश्चरणारविन्दं पश्यामि राम तमसः परतः स्थितस्य ॥ दृग्रूप[4]-
तस्त्वमसतामविगोचरो[5] ऽपि त्वन्मन्त्रपूतहृदयेषु[6] सदा प्रसन्नः ॥ ३१ ॥

त्रिगुणया मायया (पू.) ॥ भासि; ईश, सलिलपात्रगतः[3] रविः अनेकः यद्वत्, [ तथा ] त्वं ( मू. ) [ भासि. ]. ॥ ३० ॥ राम, ( पू. ) भवतः चरणारविन्दं पश्यामि. ॥ ( मू. ) [ असि ]. ॥ ३१ ॥

---

१ ब्रह्मदेव. २ भासतोस. ३ उदकाच्या भांड्यांत असलेला. ४ दृष्टीला. ५ न समजणारा. ६ तुझ्या मंत्रानें पवित्र झालेल्या हृदयांत.

रामाचें सध्याचें स्वरूप.

रामा, वास्तविक ह्मटलें तर तुला रूप नाहीं; पण मायेच्यायोगानें व्यवहार करण्यासाठीं तूं जें हें रूप घेतलेंस त्या ह्याचें मला दर्शन मिळालें. हें स्वरूप कोटि मदनांपेक्षां रमणीय आहे; हातांमध्यें सुंदर धनुष्यबाण असून अंतःकरण दयार्द्र आहे; ह्या मूर्तीचें मुख हास्याच्यायोगानें सुशोभित दिसतें. ॥ ३२ ॥ हे सीतारामा, तूं, सध्यां शरीरावर कृष्णाजिन हेंच वस्त्र घेतलें आहेस; तुला कोणाच्यानेंही भीति दाखववत नाहीं; लक्ष्मण तुझ्या चरणकमलाची नित्य सेवा करितो; तुझी अंगकांति नीलवर्ण कमलाप्रमाणें आहे; आंगांत अनंत गुण भरले असूनही पुन्हां तूं अत्यंत गंभीर दिसतोस. माझ्या भाग्यामुळेंच तूं हा अवतार घेतलास ( अशा स्वरूपाचें दर्शन मिळणें माझ्या भाग्यांत होतें ह्मणून तुला हा अवतार घ्यावा लागला ). रामा, तुला मी नित्य

पश्यामि राम तव रूपमरूपिणो ऽपि मायाविडम्बनकृतं सुमनुष्यवेषम् ॥ कन्दर्पकोटिसुभगं कमनीयचापबाणं दयार्द्रहृदयं स्मितचारुवक्त्रम् ॥ ३२ ॥ सीतासमेतमजिनाम्बरमप्रधृष्यं सौमित्रिणा नियतसेवितपादपद्मम् ॥ नीलोत्पलद्युतिमनन्तगुणं प्रशान्तं मद्भागधेयमनिशं प्रणमामि रामम् ॥ ३३ ॥

राम, अरूपिणोपि तव (मू.) रूपं पश्यामि. ॥ ३२ ॥ ( मू. ) अनिशं प्रणमामि. ॥ ३३ ॥

---

१ ज्याला रूप नाहीं अशा. २ कोटि मदनांप्रमाणें सुंदर, अशा. ३ सुंदर आहेत धनुष्य आणि बाण ज्याचे, अशा. ४ हास्यानें सुंदर आहे मुख ज्याचें, अशा. ५ चर्म हेंच ज्याचें वस्त्र, अशा. ६ कोणालाही न भिणाऱ्या. ७ नित्य सेविलें चरणकमळ ज्याचें, अशा. ८ निळ्या कमळाप्रमाणें कांति ज्याची, अशा. ९ माझें मूर्तिमान् भाग्य, अशा.

प्रणाम करितों. ॥ ३३ ॥ रामा, देश, काल इत्यादि उपाधींनीं रहित व पूर्ण ज्ञानज्योतिरूप अशा तुझ्या स्वरूपाचें ज्ञान ज्यांना होत असेल त्यांना खुशाल होवो. - स्वतां मला, जर ह्मणशील, तर असें वाटत आहे कीं, - आज प्रत्यक्ष पुढें जें हें स्वरूप दिसत आहे, तेंच माझ्या ह्रदयांत निरंतर असो, ह्मणजे झालें. ह्या शिवाय दुसऱ्या कशाचीही मला इच्छा नाहीं.' ॥ ३४ ॥ त्यानें अशा प्रकारें स्तुति केली असतां राम हांसत हांसत त्याला ह्मणाला :– 'मुने, तुझें अंतःकरण माझ्या उपासनेनें निर्मल झालें आहे, हें मी जाणतों. ॥३५॥ आणि ह्मणूनच मी तुझ्या भेटीस आलों. माझ्या भक्तीशिवाय दुसरा तरणोपाय कोणताही नाहीं. जगामध्यें जे लोक माझी उपासना करितात, ॥ ३६ ॥ व सर्व इच्छा सोडून एकनिष्ठपणें वागतात, त्यांना प्रतिदिनीं

जानन्तु राम तव रूपमशेषदेशकालाद्युपाधिरहितं घनचित्प्रकाशम्[1] ॥ प्रत्यक्षतोऽद्य मम गोचरमेतदेव रूपं बिभातु ह्रदये न परं विकांक्षे[2]॥३४॥ इत्येवं स्तुवतस्तस्य रामः सस्मितमब्रवीत् ॥ मुने जानामि ते चित्तं निर्मलं मदुपासनात् ॥ ३५ ॥ अतोऽहमागतो द्रष्टुं मद्भते नान्यसाधनम् ॥ मन्मन्त्रोपासका लोके मामेव शरणं गताः ॥ ३६ ॥ निरपेक्षा[3] नान्यगतास्[4]तेषां दृश्योऽहमन्वहम् ॥

राम, [ अन्ये ] ( पू. ) जानन्तु; ॥ ( मू. ) विभातु; परं न विकांक्षे.' ॥ ३४ ॥ ( पू. ) – '(मू.) निर्मलं जानामि. ॥ ३५ ॥ अतः अहं द्रष्टुं आगतः. ( मू. ). ॥ ३६ ॥ ये (पू.) दृश्यः. ॥

१ पूर्ण ज्ञानप्रकाशरूपी. २ इच्छितों. ३ निरिच्छ. ४ दुसऱ्याकडे न गेलेले.

माझें दर्शन मिळतें. तूं केलेली ही स्तुति मला प्रिय आहे. जो मनुष्य नित्य ह्या स्तोत्राचा पाठ करील, ॥ ३७ ॥ त्याची मजवर भक्ति जडेल व त्याला निर्मल ज्ञान प्राप्त होईल. तूं माझी उपासना केल्यामुळें आतांच सर्व क्रियांपासून मुक्त आहेस. ॥ ३८ ॥ तुला देहांतीं माझ्या स्वरूपीं ऐक्य प्राप्त होईल ह्यांत संदेह नाहीं. सुतीक्ष्णा, तुझा गुरु मुनिश्रेष्ठ जो अगस्त्य त्याचें दर्शन घ्यावें अशी मला इच्छा झाली आहे; माझें मन तेथेंच कांहीं दिवस राहायाला जावें, अशाबद्दल त्वरा करितें.' ॥ ३९ ॥ सुतीक्ष्ण मुनिही ह्मणाला :—'रामा, ठीक आहे. उद्यां आपण तिकडे जावें. महामुनींचें दर्शन घेतल्याला फार दिवस झाले ह्मणून मीही पण आपल्याबरोबर येईन. ॥ ४० ॥

स्तोत्रमेतत्पठेद्यस्तु त्वत्कृतं मत्प्रियं सदा ॥ ३७ ॥ सद्भक्तिर्मे भवेत्तस्य ज्ञानं च विमलं भवेत् ॥ त्वं ममोपासनादेव विमुक्तोऽसीह सर्वतः ॥ ३८ ॥ देहान्ते मम सायुज्यं लप्स्यसे नात्र संशयः ॥ गुरुं ते द्रष्टुमिच्छामि ह्यगस्त्यं मुनिनायकम् ॥ किंचित्कालं तत्र वस्तुं मनो मे त्वरयत्यलम् ॥ ३९ ॥ सुतीक्ष्णोऽपि तथेत्याह श्वो गमिष्यसि राघव ॥ अहमप्यागमिष्यामि चिरदृष्टो महामुनिः ॥ ४० ॥

यः त्वत्कृतं सदा मत्प्रियं एतत् ( मू. ), ॥ ३७ ॥ तस्य, मे सद्भक्तिः, विमलं (पू.). ॥ (मू.) विमुक्तः असि, ॥ ३८ ॥ (पू.) ॥ ( द्वि. मू. ) ते गुरुं द्रष्टुं इच्छामि. ॥ मे मनः ( मू. ) त्वरयति.' ॥ ३९ ॥ ( पू. ) – ' राघव, श्वः गमिष्यसि; ॥ ( मू. ) चिरदृष्टः. ॥ ४० ॥

१ पावशील. २ त्वरा करितें.

- शंकर ह्मणाले :–पार्वति, - रामाचें अंतःकरण अगस्त्यमुनींशीं संभाषण करण्याविषयीं फार उत्सुक झालें होतें. नंतर, दुसरे दिवशीं सकाळीं सुतीक्ष्ण मुनि, सीता आणि लक्ष्मण ह्यांना बरोबर घेऊन रामचंद्र निघाला तो हळूहळू, ज्या ठिकाणीं अगस्त्यमुनींचा कनिष्ठ बंधु राहत असे, त्या आश्रमांत येऊन पोंचला. ॥ ४१ ॥

## इति श्रीमदध्यात्मरामायणार्थबोधे अरण्यकाण्डे द्वितीयः सर्गः ॥ २ ॥

- शंकर ह्मणाले :–पार्वति, - सुतीक्ष्ण मुनि, जानकी आणि लक्ष्मण ह्यांसह रामचंद्र अगस्त्याच्या बंधूच्या आश्रमांत मध्यान्ह काळीं येऊन पोंचला. ॥ १ ॥ त्यामुनीनें रामाची पूजा केली व रामानेंही उत्तम उत्तम मुळें फळें वगैरे भक्षिलीं. दुसरे दिवशीं सकाळीं उठून सर्वजण अगस्त्याच्या आश्रमास आले. ॥ २ ॥ तें स्थल

अथ प्रभाते मुनिना समेतो रामः ससीतः सह लक्ष्मणेन ॥ अगस्त्यसंभाषणलोलमानसः शनैरगस्त्यानुजमन्दिरं ययौ ॥ ४१ ॥ इति श्रीम० रा० उ० अरण्यकाण्डे द्वितीयः सर्गः ॥ २ ॥ अथ रामः सुतीक्ष्णेन जानक्या लक्ष्मणेन च ॥ अगस्त्यस्यानुजस्थानं मध्याह्ने समपद्यत ॥ १ ॥ तेन संपूजितः सम्यग्भुक्त्वा मूलफलादिकम् ॥ परेद्युः प्रातरुत्थाय जग्मुस्तेऽगस्त्यमण्डलम् ॥ २ ॥ सर्वर्तुफलपुष्पाढ्यं नानामृगगणैर्युतम् ॥ पक्षिसंघैश्च विविधैर्नादितं नन्दनोपमम् ॥ ३ ॥

( मू. ) रामः लक्ष्मणेन सह ( बा. मू. ). ॥ ४१ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणान्वये अरण्यकांडे द्वितीयः सर्गः ॥२॥ (मू.). ॥१॥ (पू.) भुक्त्वा ॥ (बा.२।३।४मू. ) ब्रह्मलोकं इव अगस्त्यमंडलं जग्मुः.

१ पोंचला. २ पक्ष्यांच्या समुदायांनीं. ३ नंदन वनासारख्या. ४ गेले.

सर्व ऋतूंत फळांनीं व फुलांनीं भरलेलें असे; तेथें अनेक जातींच्या पशूंचे समुदाय होते व विविध पक्ष्यांचे थवे एकसारखे शब्द करीत असत; त्या वनाला इंद्राच्या नंदनवनाची उपमा बरोबर साजे. ॥ ३ ॥ तेथें पुष्कळ ब्रह्मर्षि व देवर्षि राहत असत. मधून मधून ऋषींचे आश्रम असल्यामुळें तो प्रदेश सर्व बाजूंनीं सुशोभित दिसे. - पाहणाराला असा भास होई कीं, - हा दुसरा ब्रह्मलोकच असावा. ॥ ४ ॥ रामचंद्र आश्रमाच्या बाहेरच उभा राहून सुतीक्ष्णमुनीला ह्मणाला :–' सुतीक्ष्णा, तूं लवकर जा आणि अगस्त्य मुनिवर्यांना सांग कीं, लक्ष्मण आणि सीता ह्यांसह राम आला आहे. ' ॥ ५ ॥ ' ही आज्ञा ह्मणजे मजवर अनुग्रहच होय.' असें ह्मणून सुतीक्ष्ण मुनि त्वरेनें गुरूच्या आश्रमीं गेला. त्या ठिकाणीं ऋषींच्या समुदायानें वेष्टिलेले ॥ ६ ॥ अगस्त्य मुनि बसले होते. त्यांच्या सहवासाला विशेषतः

ब्रह्मर्षिभिर्देवर्षिभिः सेवितं मुनिमन्दिरैः[1] ॥ सर्वतो ऽलंकृतं साक्षाद्ब्रह्मलोकमिवापरम् ॥ ४ ॥ बहिरेवाश्रमस्याथ स्थित्वा रामो ऽब्रवीन्मुनिम् ॥ सुतीक्ष्ण गच्छ त्वं शीघ्रमागतं मां निवेदय ॥ अगस्त्यमुनिवर्याय सीतया लक्ष्मणेन च ॥ ५ ॥ महाप्रसाद इत्युक्त्वा सुतीक्ष्णः प्रययौ गुरोः ॥ आश्रमं त्वरया तत्र ऋषिसंघसमावृतम्[3] ॥ ॥ ६ ॥ उपविष्टं रामभक्त्यैर्विशेषेण समायुतम् ॥

॥ २ ॥ ३ ॥ ४ ॥ अथ रामः आश्रमस्य ( मू. ) अब्रवीत् – ॥ ' ( द्वि. अ. ) सीतया लक्ष्मणेन च [ सह ] आगतं मां ( मू. ) निवेदय. ॥ ५ ॥ ( मू. ) गुरोः आश्रमं प्रययौ; ॥ ६ ॥ ( पू. ) ॥

१ मुनींच्या आश्रमांनीं. २ कळव. ३ ऋषींच्या समूहानें वेष्टिलेल्या.

राममक्त फार असत. ह्या वेळीं ते आपल्या शिष्यांना अत्यंत भक्तिपूर्वक राममंत्राचा स्पष्ट अर्थ सांगत होते. ॥ ७ ॥ ते श्रेष्ठ मुनि अगस्त्य दृष्टीस पडतांच महाबुद्धिमान सुतीक्ष्ण त्यांच्याजवळ गेला व साष्टांग नमस्कार घालून नम्रपणें त्यांना ह्मणालाः– ॥ ८ ॥ 'अहो ब्रह्मनिष्ठ महाराज, दशरथाचा पुत्र रामचंद्र सीता आणि लक्ष्मण या दोघांसह आपल्या दर्शनाकरितां आला असून बाहेर हात जोडून उभा आहे.' ॥ ९ ॥ अगस्त्य ह्मणाले:–'सुतीक्ष्णा, - मोठ्या आनंदाची वार्ता सांगितलीस. - तुझें कल्याण असो. जा, त्याला लवकर घेऊन ये. राम माझ्या हृदयांत नित्य वसत आहे. मी त्याचें प्रत्यक्ष दर्शन मिळावें अशी इच्छा धरून त्याचें ध्यान करीत येथें राहिलों आहें.' ॥ १० ॥ असें बोलून अगस्त्य मुनि स्वतां

व्याख्यातराममंत्रार्थं[1] शिष्येभ्यश्चातिभक्तितः ॥७॥ दृष्ट्वाऽगस्त्यं मुनिश्रेष्ठं सुतीक्ष्णः प्रययौ मुनेः ॥ दण्डवत्प्रणिपत्याह विनयावनतः सुधीः ॥८॥ रामो दाशरथिर्ब्रह्मन् सीतया लक्ष्मणेन च॥ आगतो दर्शनार्थं ते बहिस्तिष्ठति साञ्जलिः॥ ९॥ अगस्त्य उवाच ॥ शीघ्रमानय भद्रं ते रामं मम हृदि स्थितम् ॥ तमेव ध्यायमानोऽहं कांक्षमाणो[2]ऽत्र संस्थितः॥ १०॥ इत्युक्त्वा स्वयमुत्थाय मुनिभिः सहितो मुनिः ॥

अतिभक्तितः शिष्येभ्यः (मू.) ॥ ७ ॥ मुनिश्रेष्ठं अगस्त्यं (पू.) [ समीपं ] प्रययौ. ॥ सुधीः [ सः ] (मू.)[सन्] प्राह - ॥८॥ 'ब्रह्मन, दाशरथिः (पू.) [सह] ॥ ते दर्शनार्थं आगतः; साञ्जलिः (मू.).' ॥ ९ ॥ अ० उ० – 'ते भद्रं; (पू.) रामं, शीघ्रं आनय. ॥ अहं ( मू. ).' ॥ १० ॥ ( पू. ) ॥

१ सांगितला राममंत्राचा अर्थ ज्यानें अशा. २ इच्छिणारा.

उठले व मुनींना बरोबर घेऊन परम भक्तीनें रामाला सामोरे आले. (जवळ पोंचल्यावर) ते त्याला ह्मणालेः-- ॥११॥ 'रामा, आलास, - फार चांगलें झालें. - तुझें कल्याण असो. तुझा समागम घडला, तेव्हां आजचा दिवस मोठ्या आनंदाचा ! (माझा प्रिय अतिथि (पाहुणा) घरीं आला, त्या अर्थी आजचा माझा दिवस सफल झाला.' ॥ १२ ॥ अगस्त्यमुनि सामोरे आले, असें पाहिल्यावर रामाचाही आनंद गगनांत माईना. त्यानें सीता आणि लक्ष्मण ह्यांसह धरणीवर लोटांगण घातलें. ॥ १३ ॥ त्या श्रेष्ठ मुनींनीं तत्काळ रामाला उठवून प्रेमानें दृढ आलिंगन दिलें. त्याच्या शरीराचा स्पर्श झाल्याबरोबर मुनींला आनंद होऊन त्यांच्या नेत्रांतून एकसारखे अश्रु वाहूं लागले. ॥ १४ ॥ ते श्रेष्ठ मुनि एका हातानें रामाचा हात धरून - त्याला घेऊन - आपल्या आश्रमांत गेले. त्यांच्या मनाला ह्या वेळीं पराकाष्ठेचा आनंद झाला होता. ॥ १५ ॥

अभ्यंयात्परया भक्त्या गत्वा राममथाब्रवीत् ॥ ११ ॥ आगच्छ राम भद्रं ते दिष्ट्या तेऽद्य समागमः ॥ प्रियातिथिर्मम प्राप्तोऽस्त्यद्य मे सफलं दिनम् ॥ १२ ॥ रामोऽपि मुनिमायान्तं दृष्ट्वा हर्षसमाकुलः ॥ सीतया लक्ष्मणेनापि दण्डवत्पातितो भुवि ॥ १३ ॥ द्रुतमुत्थाप्य मुनिराड्राममालिंग्य भक्तितः ॥ तद्गात्रस्पर्शजाल्हादस्रवन्नेत्रजलाकुलः ॥ १४ ॥ गृहीत्वा करमेकेन करेण रघुनन्दनम् ॥ जगाम स्वाश्रमं हृष्टो मनसा मुनिपुंगवः ॥ १५ ॥

( मू. ) – ॥ ११ ॥ ' राम, ( मू. ).' ॥ १२ ॥ ( मू. ) पातितः ॥ १३ ॥ मुनिराट् (मू.) [जातः]. ॥ १४ ॥ मनसा हृष्टः मुनिपुंगवः ( पू. ) करं गृहीत्वा ॥ ( मू. ) जगाम. ॥ १५ ॥



१ सामोरा गेला. २ त्याच्या शरीराच्या स्पर्शानें उत्पन्न झालेल्या आनंदामुळें पाझरणाऱ्या नेत्रांतील उदकानें व्याकुळ.

रामचंद्र स्वस्थपणें बसला असतां अगस्त्यमुनींनीं त्याची षोडशोपचारें पूजा केली व लोकरीतीला अनुसरून वनांतील अनेक प्रकारांच्या भक्ष्य फलांचें त्याला भोजन घातलें. ॥ १६ ॥ पुढें तो पूर्णचंद्रवदन प्रभु एकांतांत सुखानें बसला असतां ज्ञानसंपन्न अगस्त्य ऋषींनीं हात जोडून त्याला असें ह्मटलें :— ॥ १७ ॥ "रामा, तुझ्या येण्याची वाट पाहत मी येथें राहिलों आहें. ज्या वेळीं पूर्वी क्षीरसमुद्रांत ब्रह्मदेवानें भूमीचा भार उतरण्याकरितां रावणाचा वध करण्याबद्दल तुझी प्रार्थना केली, ॥ १८ ॥ तेव्हांपासून, ह्या मुनींसह मी तुझें दर्शन घडावें ह्या इच्छेनें तप करीत राहिलों आहें. रामा, माझें ध्यान सर्वकाळ तुजकडेच लागलेलें असतें. ॥ १९ ॥ सृष्टीच्या पूर्वी तूं एकच होतास. हा त्रिगुणां-

सुखोपविष्टं संपूज्य पूजया बहुविस्तरम् ॥ भोजयित्वा यथान्यायं भोज्यैर्वन्यैरनेकधा ॥ १६ ॥ सुखोपविष्टमेकान्ते रामं शशिनिभाननम् ॥ कृताञ्जलिरुवाचेदमगस्त्यो भगवानृषिः ॥ १७ ॥ त्वदागमनमेवाहं प्रतीक्षन्समवस्थितः ॥ यदा क्षीरसमुद्रान्ते ब्रह्मणा प्रार्थितः पुरा ॥ भूमेर्भारापनुत्त्यर्थं रावणस्य वधाय च ॥ १८ ॥ तदादि दर्शनाकांक्षी तव राम तपश्चरन् ॥ वसामि मुनिभिः सार्धं त्वामेव परिचिन्तयन् ॥ १९ ॥ सृष्टेः प्रागेक एवासीर्निर्विकल्पोऽनुपाधिकः ॥

(पू.) संपूज्य, ॥ ( मू. ) भोजयित्वा, ॥ १६ ॥ कृताञ्जलिः भगवान् अगस्त्यः ऋषिः एकान्ते (मू.) रामं इदं उवाच – ॥ १७ ॥ "( पू. ) अहं ॥ पुरा ( मू. ) प्रार्थितः, ॥ १८ ॥ राम, तदादि तव ( मू. ) [ अहं ] मुनिभिः सार्धं वसामि. ॥ १९ ॥ (पू.) आसीः. ॥

१ वनांतील फळांनीं. २ चंद्रासारखें मुख ज्याचें, अशा. ३ वाट पाहणारा. ४ प्रपंचरहित. ५ ज्याला उपाधि नाहीं, असा.

पासून उद्भवणारा प्रपंच त्यावेळीं तुझ्या ठिकाणीं नव्हता; कारण, तूं मायारूप उपाधीनें रहित होतास. तुझ्या शक्तीला माया असें ह्मणतात; - तिचे दोन प्रकार आहेतः एक माया आणि दुसरी अविद्या : जीव हें तरी तुझेंच स्वरूप होय :- त्याच्या ठिकाणीं आश्रयत्वानें राहणारी शक्ति माया व तुझ्याविषयीं जीवाला असणारें अज्ञान ही अविद्या होय. ॥ २० ॥ तुझ्या गुणरहित स्वरूपालाच जेव्हां ती शक्ति आवृत करिते ( तीच, तुझ्याशीं स्वतांचा संबंध आहे, असें मानिते ), त्या वेळीं, वेदांत शास्त्रांत निष्णात लोक तिला ' प्रधान ' अशी संज्ञा देतात. ॥ २१ ॥ तिलाच कित्येक लोक ' मूल प्रकृति ' ह्मणतात, कोणी ' माया, ' कोणी 'संसृति, ' कोणी ' बंध ' अशीं वेगवेगळीं नांवें देतात. ॥ २२ ॥ तूं तिजमध्यें क्षोभ उत्पन्न केलास ( तुझ्या काल्पनिक संबंधामुळें तिजमध्यें क्षोभ उत्पन्न झाला ) कीं, ती माया ' महत्तत्त्व ' प्रसवते. तुजकडून

त्वदाश्रया त्वद्विषया माया ते शक्तिरुच्यते ॥ २० ॥ त्वामेव निर्गुणं शक्तिरावृणोति यदा तदा ॥ अव्याकृतमिति[1] प्राहुर्वेदान्तपरिनिष्ठिताः[2] ॥ २१ ॥ मूलप्रकृतिरित्येके प्राहुर्मायेति केचन॥अविद्या संसृतिर्बन्ध इत्यादि बहुधोच्यते ॥ २२ ॥ त्वया संक्षोभ्यमाणा[3] सा महत्तत्त्वं प्रसूयते[4]॥महत्तत्त्वादहंकारस्त्वया संचोदितादभूत्[5] ॥ २३ ॥

(१ मू. ). ॥ २० ॥ वेदांतपरिनिष्ठिताः, यदा शक्तिः निर्गुणं ( मू. ). ॥ २१ ॥ एके ( मू. ). ॥ २२ ॥ (पू.); ॥ त्वया संचोदितात् ( मू. ). ॥ २३ ॥

१ अस्पष्ट ( प्रधान ) रूपी. २ वेदांतांत निष्णात. ३ चाळविलेली. ४ प्रसवते. ५ प्रेरिलेल्या.

प्रेरणा मिळाली ह्मणजे त्या महत्तत्त्वापासून 'अहंकार' उद्भवतो. ॥२३॥ महत्तत्त्वानें युक्त अशा त्या अहंकाराचे तीन प्रकार होतात; त्यांना (१) सात्त्विक, (२) राजस, आणि (३) तामस अशा तीन संज्ञा आहेत.॥२४॥ तामस अहंकारापासून सूक्ष्मभूतें होतात. रामा, त्या सूक्ष्मभूतांपासून पुढें एकापासून एक अशीं स्थूलभूतें होतात. त्यामध्यें उत्तरोत्तर क्रमानें एक एक गुण जास्त असतो. ( प्रथम आकाश उत्पन्न होतें; त्याचा गुण शब्द. पुढें स्पर्श सूक्ष्मभूत व आकाश ह्यांपासून वायु उद्भवतो; त्याचा गुण स्पर्श, शिवाय त्याच्या आदिकारणाचा गुण जो शब्द तोही परंपरेनें त्या वायूंत येतो अर्थांत वायूचे शब्द आणि स्पर्श हे दोन गुण होतात. वायु आणि रूप सूक्ष्मभूत ह्यांपासून अग्नि होतो; त्याचा गुण रूप, व मागील परंपरासंबंधानें आलेले गुण दोन, एकंदर अग्नीचे गुण शब्द, स्पर्श, रूप, असे तीन. अग्नि व रस सूक्ष्मभूत ह्यांपासून उदक जन्मास येतें; त्याचा गुण रस, मागील संबंधानें आलेले गुण धरिले असतां उदकाचे गुण शब्द, स्पर्श, रूप, रस हे चार. उदक व गंध सूक्ष्म भूत ह्यांपासून पृथ्वी होते; तिचा गुण गंध, शिवाय मागील क्रमाप्रमाणें आलेले गुण चार, एकंदरींत पृथ्वीचे गुण शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध असे पांच ). ॥ २५ ॥

अहंकारो महत्तत्त्वसंवृतस्त्रिविधोऽभवत्॥ सात्त्विको राजसश्चैव तामसश्चेति भण्यते ॥ २४ ॥ तामसात्सूक्ष्मतन्मात्राण्यासन् भूतान्यतः परम् ॥ स्थूलानि क्रमशो राम क्रमोत्तरगुणानि ह ॥ २५ ॥

महत्तत्त्वसंवृतः ( मू. ). ॥ २४ ॥ राम, ( पू. ) अतः परं ( मू. ) भूतानि ॥ २५ ॥

१ महत्तत्वानें संयुक्त. २ ह्मटला जातो. ३ सूक्ष्म भूतें. ४ क्रमानें अधिक आहेत गुण ज्यांत, अशीं.

त्रिविध अहंकाराचीं कार्यें.

रजोगुणी अहंकारापासून - ( १ ) कर्ण, ( २ ) त्वचा, ( ३ ) नेत्र, ( ४ ) जिव्हा, ( ५ ) घ्राण हीं पांच ज्ञानेंद्रियें व ( ६ ) वाणी, ( ७ ) हस्त, ( ८ ) पाद, ( ९ ) गुद, ( १० ) उपस्थ हीं पांच कर्मेंद्रियें अशीं एकंदर दहा - इंद्रियें उत्पन्न झालीं. सात्त्विक अहंकारापासून - त्या दहा इंद्रियांच्या क्रमानें ( १ ) दिशा, ( २ ) वायु, ( ३ ) सूर्य, ( ४ ) वरुण, ( ५ ) अश्विनीकुमार, ( ६ ) अग्नि, ( ७ ) इंद्र, ( ८ ) विष्णु, ( ९ ) मित्र, ( १० ) प्रजापति, ह्या दहा - देवता आणि मन हीं उत्पन्न झालीं. त्यांपासून क्रियाशक्ति सूत्रात्मा प्राण झाला. हीं सगळीं मिळून हें सर्व कार्यें करणारें समष्टि हिरण्यगर्भरूप लिंगशरीर होय. ॥ २६ ॥ पुढें स्थूल भूतांच्या समूहापासून विराट् उदय पावला. ह्या विराट् रूपापासूनच स्थावरजंगमात्मक सर्व जग होतें. ॥ २७ ॥ - ज्याप्रमाणें निरनिराळ्या ऋतूंत एकामागूनएक धान्यें उत्पन्न होतात, त्याप्रमाणें - काल आणि कर्म ह्यांच्या संयोगानें क्रमशः देव तिर्यक् (पशुपक्ष्यादि ) व मनुष्य इत्यादि योनि

राजसानीन्द्रियाण्येव सात्विकाद्देवता मनः ॥ तेभ्यो ऽभवत्सूत्ररूपं[1] लिंगं सर्वगतं[2]
महत् ॥२६॥ ततो विराट् समुत्पन्नः स्थूलाद्भूत[3]कदम्बकात् ॥ विराजः पुरुषात्स-
र्वं जगत्स्थावरजंगमम् ॥ २७ ॥ देवा[4]तिर्यङ्मनुष्याश्च कालकर्मक्रमेण तु ॥ त्वं
रजोगुणतो ब्रह्मा जगतः सर्वकारणम् ॥ २८ ॥

( मू. ) लिंगं अभवत्. ॥ २६ ॥ (पू.) विराट् समुत्पन्नः. ॥ (मू.) जगत्. ॥ २७ ॥ ( पू. ) [ अभवन् ]. ॥ ( मू. ) ब्रह्मा; ॥ २८ ॥

१ सूत्रात्मा ( प्राण ). २ सर्वव्यापक. ३ भूतांच्या समुदायापासून. ४ देव, पशुपक्षी, मनुष्य.

॥ १६ ॥

प्राण्याला प्राप्त होतात. तूं रजोगुणाचा स्वीकार केलास ह्मणजे सर्व सृष्टीचा उत्पादक ब्रह्मदेव होतोस. ॥ २८ ॥ सत्व गुण अंगीकारून विश्वाचें पालन करूं लागलास ह्मणजे सत्पुरुष तुला विष्णु अशी संज्ञा देतात. जगाच्या प्रलयकालीं तूंच रुद्र होतोस. तुझ्या मायेच्या भिन्न भिन्न (तीन) गुणावरून (त्यांचें कमजास्ती प्रमाणानें मिश्रण झालें असतां) ॥ २९ ॥ बुद्धीच्या निरानिराळ्या वृत्ति होतात; त्या वृत्तींना जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति अशीं नांवें आहेत. रामा, तूं त्या तिन्ही अवस्थांहून विलक्षण (तुरीय) आहेस. तूं त्यांचा साक्षी, ज्ञानरूप व विकाररहित आहेस. ॥ ३० ॥ ज्या वेळीं तुला सृष्टिरूप लीला करावी अशी इच्छा होते, त्यावेळीं तूं मायेच्या काल्पनिक संबंधाचा अंगिकार करितोस - व वास्तविक गुणरहित असूनही - गुणवानासारखा भासतोस. ॥ ३१ ॥ रामा, तुझी माया नेहमीं विद्या आणि अविद्या अशा दोन प्र-

सत्त्वाद्विष्णुस्त्वमेवास्य पालकः सद्भिरुच्यसे॥लये रुद्रस्त्वमेवास्य त्वन्मायागुणभेदतः ॥ २९ ॥ जाग्रत्स्वप्नसुषुप्त्याख्यवृत्तयो बुद्धिजैर्गुणैः ॥ तासां विलक्षणो[2] रामस्त्वं साक्षी चिन्मयो[3]ऽव्ययः[4] ॥ ३० ॥ सृष्टिलीलां यदा कर्तुमीहसे[5] रघुनन्दन ॥ अंगीकरोषि मायां त्वं तदा वै गुणवानिव ॥ ३१ ॥ राम माया द्विधा भाति विद्याऽविद्येति ते सदा ॥ प्रवृत्तिमार्गनिरता अविद्यावशवर्तिनः[6] ॥

(पू.) ॥ अस्य (मू.) रुद्रः. ॥ २९ ॥ बुद्धिजैः गुणैः (मू.) रामः त्वं. ॥ ३० ॥ रघुनन्दन, यदा (पू.), ॥ तदा त्वं गुणवानिव मायां (मू.) ॥ ३१ ॥ राम, ते (पू.) द्विधा भाति. (मू.). ॥

१ मायेपासून उद्भवणाऱ्या. २ वेगळा, रहित. ३ ज्ञानरूपी. ४ विकाररहित. ५ इच्छा करितोस. ६ अज्ञानाच्या स्वाधीन राहणारे.

'तुझे भक्त मुक्त होतात.'

कारांची भासत असते; - अर्थात तीच संसार आणि मोक्ष दोन्ही देऊं शकते. - जे प्राणी प्रवृत्तिमार्गांत (संसारांत ) गढून गेलेले असतात, ते अविद्येच्या अधीन आहेत असें समजावें; जे लोक निवृत्तिमार्गांत रमून जाऊन वेदांताच्या अर्थाचा विचार करितात, व ॥ ३२ ॥ तुझी भक्ति करण्यांत निमग्न होऊन होऊन गेलेले असतात, ते विद्यामय ( तत्त्वज्ञानी ) होत. अविद्येच्या पाशांत पडलेले लोक नित्य संसारीच राहतात : तत्त्वज्ञानाच्या अभ्यासांत गुंतलेले असतील ते जन नित्यमुक्त होत. ॥ ३३ ॥ जगांत तुझी भक्ति करण्यांतच रमलेले व तुझ्या मंत्राची आराधना करणारे जे लोक असतील त्यांनाच तत्त्वज्ञान प्राप्त होतें, इतरांना कधीं होत नाहीं. ॥ ३४ ॥ ह्मणून ज्यांच्या अंतरीं तुजविषयीं भक्ति वसत असेल, ते जन मुक्त होत, ह्यांत संशय नाहीं. जे पुरुष तुझी भक्ति हें अमृत जवळ बाळगीत नाहींत, त्यांना स्वप्नामध्यें देखील मोक्ष

निवृत्तिमार्गनिरता वेदान्तार्थविचारकाः॥ ३२॥त्वद्भक्ति[1]निरता ये च ते वै विद्यामयाः स्मृताः॥ अविद्यावशगा ये तु नित्यं संसारिणश्च ते ॥ विद्याभ्यासरता ये तु नित्यमुक्तास्त एव हि ॥ ३३ ॥ लोके त्वद्भक्तिनिरतास्त्वन्मन्त्रोपासकाश्च ये॥ विद्या प्रादुर्भवेत्तेषां नेतरेषां कदाचन ॥ ३४ ॥ अतस्त्वद्भक्तिसंपन्ना मुक्ता एव न संशयः॥[2]त्वद्भक्त्यमृतहीनानां मोक्षः स्वप्ने ऽपि नो भवेत् ॥ ३५ ॥

( मू. ). ॥ ३२ ॥ ३३ ॥ ये (पू.) ॥ तेषां ( मू. ) न [ भवेत् ]. ॥ ३४ ॥ ३५ ॥ ॥१७॥

१ तुझी भक्ति करण्यांत तत्पर. २ तुझी भक्ति ह्या अमृतानें रहित ( तें ज्यांना मिळत नाहीं ) अशांना.

मिळायाचा नाहीं. ॥३५॥ रामा, फार कशाला सांगूं ? सगळ्यांचें सार तुला थोडक्यांत सागतों कीं, सत्पुरुषांचा समागम हेंच ह्या जगांत मोक्षसाधन, असें ह्मटलें आहे. ॥ ३६ ॥ जे पुरुष सर्वत्र समदृष्टि ठेवीत असतील; - राग, द्वेष ह्यांचें कारण जी - विषयवासना ती ज्यांच्याजवळ नसेल; पुत्रैषणा, वित्तैषणा वगैरे एषणा (इच्छा) ज्यांना नसतील ह्मणजे सर्व प्रकारच्या कामना ज्यांच्या मनांतून गेल्या असतील; आणि ज्यांनीं इंद्रियनिग्रह केला असून पूर्ण शांति व तुझी भक्ति स्वीकारिली असेल, ते सत्पुरुष होत. ॥ ३७ ॥ अशा प्रकारचे पुरुष, प्रिय वस्तूची प्राप्ति किंवा विपत्ति, कसलाही प्रसंग आला तरी एकसारखी वृत्ति ठेवितात, कोणत्याही ठिकाणीं आसक्ति ठेवीत नाहींत, व सर्व कर्मांचा त्याग करून सर्वकाळ ब्रह्मरूपीं रमून गेलेले असतात;

किं राम बहुनोक्तेन सारं किंचिद्ब्रवीमि ते ॥ साधुसंगतिरेवात्र मोक्षहेतुरुदाहृता ॥ ३६ ॥ साधवः समचित्ता ये निःस्पृहा विगतैषिणः[1] ॥ दान्ताः[2] प्रशान्तास्त्वद्भक्ता निवृत्ताखिलकामनाः[3] ॥ ३७ ॥ इष्टप्राप्तिविपत्त्योश्च[4] समाः संगविवर्जिताः ॥ संन्यस्ताखिलकर्माणः[5] सर्वदा ब्रह्मतत्पराः ॥ ३८ ॥

राम, बहुना उक्तेन किं ? किंचित् ( मू. ). ॥ ३६ ॥ ये साधवः, [ ते ] ( मू. ) ॥ ३७ ॥ ३८ ॥

---

१ ज्यांच्या - पुत्र द्रव्य इत्यादिकांविषयीं - इच्छा नाहींशा झाल्या, असे. २ इंद्रियनिग्रह करणारे. ३ ज्यांच्या सर्व कामना नाहींशा झाल्या, असे. ४ प्रिय वस्तूची प्राप्ति किंवा संकट ह्यांतील कोणत्याही प्रसंगीं. ५ सोडिलीं सर्व कर्में ज्यांनीं, असे.

॥३८॥ शिवाय ते यम नियमादि अष्टांग योगाचा अभ्यास करून सिद्ध झालेले असल्यामुळें कोणताही प्रसंग आला असला तरी नित्य आनंदांत असतात. अशा सत्पुरुषांचा समागम घडला ह्मणजे प्राण्याला तुझ्या कथा ऐकण्याची रुचि लागते. ॥ ३९ ॥ रामचंद्रा, नंतर तुझ्या ठिकाणीं त्याची भक्ति उत्पन्न होते. तूं तीन्ही कालीं अखंडरूपी आहेस. तुजविषयीं भक्ति उद्भवली ह्मणजे प्राण्याला प्रत्यक्ष तत्त्वज्ञान ॥ ४० ॥ प्राप्त होतें. चतुर पुरुषांनीं अंगिकारिलेला मोक्षाचा मुख्य मार्ग हा होय. ह्मणून, रामचंद्रा, मला तुजविषयीं प्रेम ही उत्तम भक्ति ॥ ४१ ॥ प्राप्त व्हावी; आणि, हे दुःखहारका, विशेषेंकरून तुझ्या भक्तांचा मला समागम घडावा. आज तुझें दर्शन मिळाल्यामुळें माझ्या जन्माचें सार्थक झालें. ॥ ४२ ॥

यमादिगुणसंपन्नाः संतुष्टा येन केनचित् ॥ सत्संगमो भवेद्यर्हि त्वत्कथाश्रवणे रतिः॥३९॥समुदेति ततो भक्तिस्त्वयि राम सनातने॥ त्वद्भक्तावुपपन्नायां विज्ञानं विपुलं स्फुटम् ॥ ४० ॥ उदेति मुक्तिमार्गोऽयमाद्यश्चतुरसेवितः ॥ तस्माद्राघव सद्भक्तिस्त्वयि मे प्रेमलक्षणा ॥ ४१ ॥ सदा भूयाद्धरे संगस्त्वद्भक्तेषु विशेषतः ॥ अद्य मे सफलं जन्म भवत्संदर्शनादभूत् ॥ ४२ ॥

(पू.) संतुष्टाः ॥ [ संति ]. यर्हि सत्संगमः भवेत् [ तर्हि ] (मू.) ॥ ३९ ॥ राम, ततः सनातने त्वयि भक्तिः ( मू. ) विज्ञानं स्फुटं ॥ ४० ॥ ( पू. ) मुक्तिमार्गः. ॥ ( मू. ) सद्भक्तिः [ अस्तु ]. ॥ ४१॥ हरे, (पू.) सदा भूयात् ( मू. ) सफलं अभूत्. ॥ ४२ ॥

१ यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधि ह्या अष्टांगयोगरूपी गुणांनीं युक्त. २ उत्पन्न झाली असतां.

ईश्वरा, आज माझे सर्व यज्ञ सफल झाले. रामा, मी केवळ तुझ्या ठिकाणीं बुद्धि ठेवून पुष्कळ दिवस तपश्चर्या केली, त्या तपाचें फळ, आज माझ्या हातून तुझी पूजा घडली, हें होय. ॥ ४३ ॥ राघवा, सीतेसहवर्तमान तूं माझ्या अंतःकरणांत नित्य वास कर. मी चालत, बसलेला किंवा उभा, असलों तरी मला तुझें नित्य स्मरण व्हावें. ' ॥ ४४ ॥ अशाप्रकारें त्या श्रेष्ठ अगस्त्यमुनींनीं लक्ष्मीपति रामचंद्राची स्तुति केली, व त्याच्याच ( रामाच्या ) साठीं पूर्वीं देवेंद्रानें आश्रमांत ठेवून दिलेलें धनुष्य त्याला दिलें. ॥ ४५ ॥ त्या धनुष्याबरोबर कधींही क्षीण ( रिकामे ) न होणारे बाणांचे दोन भाते व एक खड्ग हीं आयुधें दिलीं. तें खड्ग

अद्य मे क्रतवः[1] सर्वे बभूवुः सफलाः प्रभो ॥ दीर्घकालं मया तप्तमनन्यमतिना तपः॥ तस्येह तपसो राम फलं तव यदर्चनम्॥ ४३ ॥ सदा मे सीतया सार्धं हृदये वस राघव ॥ गच्छतस्तिष्ठतो वा ऽपि स्मृतिः स्यान्मे सदा त्वयि ॥ ४४ ॥ इति स्तुत्वा रमानाथमगस्त्यो मुनिसत्तमः ॥ ददौ चापं महेन्द्रेण रामार्थे स्थापितं[3] पुरा॥४५॥ अक्षय्यौ[4] बाणतूणीरौ[5] खड्गं रत्नविभूषितम् ॥ जहि[6] राघव भूभारभूतं राक्षसमण्डलम् ॥ ४६॥

प्रभो, अद्य मे सर्वे (पू.) बभूवुः. ॥ राम, अनन्यमतिना[2] मया (द्वि. मू.) तप्तं; ॥ इह यत् तव अर्चनं, ( मू. ) ॥ ४३ ॥ राघव, मे हृदये (पू.). ॥ ( मू. ) स्मृतिः स्यात्. ” ॥ ४४ ॥ मुनिसत्तमः अगस्त्यः इति रमानाथं स्तुत्वा पुरा (मू.) चापं ददौ. ॥४५॥ (पू.) खड्गं [च ददौ]. 'राघव, (मू.) जहि,॥४६॥

१ यज्ञ. २ नाहीं दुसरेकडे बुद्धि ज्याची, अशा. ३ ठेविलेलें. ४ न क्षीण होणाऱ्या. ५ बाणांच्या भात्यांना. ६ वध कर.

अ-रा-बो.
सपू.सान्व.
सटिप्पण.
॥ १९ ॥

रत्नें जडवून सुशोभित केलें होतें. - तीं दिल्यावर मुनींनीं रामाला सांगितलें:- 'रामा, राक्षसांच्या समूहाचा पृथ्वीला अतिशय भार झाला आहे; ह्मणून तूं त्यांचा वध कर. ॥ ४६ ॥ हें कार्य करण्यासाठींच तूं मायेनें मनुष्यरूप घेतलें आहेस. येथून सुमारें आठ कोसांवर, गोदावरीतीरीं पवित्र अरण्यानें सुशोभित असा पंचवटी नांवाचा आश्रम आहे. हे रघुकुलभूषणा, तूं आतां आपले शेष असलेले वनवासाचे दिवस तेथें घालव. ॥ ४७ ॥ ४८ ॥ हे साधूंच्या पालका, तेथें देवांचीं बहुत कार्यें कर्तव्य आहेत, तीं करून टाक.' ॥ ४९ ॥ - शंकर ह्मणाले:—पार्वति, - ही अगस्त्य मुनींची उत्तम उक्ति व स्तुति सर्व तत्त्व सिद्धांतांनीं ओतप्रोत भरलेली आहे. ती ऐकून रामचंद्राला आनंद झाला. तो भक्तसंकटनाशक प्रभु सर्वज्ञ खरा; - पण त्या

यदर्थमवतीर्णो ऽसि मायया मनुजाकृतिः॥ इतो योजनयुग्मे तु पुण्यकाननमण्डि-
तः ॥ ४७ ॥ अस्ति पञ्चवटीनामा आश्रमो गौतमीतटे ॥ नेतव्यस्तत्र ते का-
लः शेषो रघुकुलोद्वह ॥ ४८ ॥ तत्रैव बहुकार्याणि देवानां कुरु सत्पते ॥ ४९ ॥
श्रुत्वा तदागस्त्यसुभाषितं वचः स्तोत्रं च तत्त्वार्थसमन्वितं विभुः ॥

(पू.) अवतीर्णः आसि. ॥ (मू.) ॥४७॥ अस्ति, ॥ रघुकुलोद्वहे, तत्र ते शेषः कालः नेतव्यः. ॥४८॥ सत्पते, देवानां (मू.).' ॥ ४९ ॥ विभुः मुदान्वितः अशेषवित् हरिः (पू.) वचः, स्तोत्रं च श्रुत्वा ॥

१ पुण्यकारक अरण्यानें सुशोभित. २ रघुकुलाला उद्धरणाऱ्या. ३ घालवावा. ४ साधूंच्या रक्षणकर्त्या. ५ सर्वज्ञ. ६ सत्य अर्थानें युक्त, अशा.

अर. कां.
सर्ग ३
'पचवटींत
राहा.'

॥ १९ ॥

वेळीं अज्ञानाप्रमाणें वागत होता; - ह्मणून त्यानें पुढें अगस्त्यमुनींचा निरोप घेऊन त्यांनीं दाखविलेल्या मार्गानें अग्रभागीं प्रयाण केलें. ॥ ५० ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणार्थबोधे अरण्यकाण्डे तृतीयः सर्गः ॥ ३ ॥

जातां जातां मार्गामध्यें, पर्वताच्या शिखरासारखा ( प्रचंड ) उभा असलेला वृद्ध जटायु पक्षी रामाच्या दृष्टीस पडला. - त्याला पाहतांच रामाला - 'हें प्रकर्ण आहे काय!' असा विस्मय वाटला. ॥१॥ तो ( राम ) लक्ष्मणाला ह्मणाला :–' लक्ष्मणा, धनुष्य घेऊन ये. हा राक्षस पुढें उभा राहिला आहे. ह्या ऋषींचें भक्षण करणाराला मारून टाकितों. ' ॥ २ ॥ तें रामाचें भाषण ऐकतांच गृध्रराजा ( जटायु ) भीतीनें गांगरून गेला

मुनिं समाभाष्य मुदाऽन्वितो ययौ प्रदर्शितं मार्गमशेषविद्धरिः ॥ ५० ॥
इति श्री० रा० उमा० अरण्यकाण्डे तृतीयःसर्गः ॥ ३ ॥ मार्गे व्रजन्ददर्शाथ
शैलशृंगमिव स्थितम् ॥ वृद्धं जटायुषं रामः किमेतदिति विस्मितः ॥ १ ॥ धनुरा-
नय सौमित्रे राक्षसोऽयं पुरः स्थितः ॥ इत्याह लक्ष्मणं रामो हनिष्याम्यृषिभक्ष-
कम् ॥ २ ॥ तच्छ्रुत्वा रामवचनं गृध्रराड् भयपीडितः ॥

( बा. मू. ) ययौ. ॥ ५० ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणान्वये अरण्यकाण्डे तृतीयः सर्गः ॥ ३ ॥ अथ मार्गे व्रजन रामः ( पू. ) जटायुषं ददर्श, ( मू. ). ॥ १ ॥ रामः, लक्ष्मणं ' सौमित्रे, धनुः आनय; (पू.); ॥ ( मू. ) [ एनं ] हनिष्यामि ' इति आह. ॥ २ ॥ गृध्रराट् तत् रामवचनं (पू.) [ सन् आह ] – ॥

१ जाणारा. २ पर्वताचें शिखर. ३ मारीन. ४ गिधाडांचा राजा.

- व रामाला ह्मणाला :-‘ रामा, तूं माझा वध करावास हें योग्य नाहीं. मी तुझ्या पित्याचा प्रिय मित्र आहें. ॥ ३ ॥ माझें नांव जटायु. रामा, तुझें कल्याण होवो. मी तुझ्या मनाप्रमाणें वागणारा आहें. ॥ ४ ॥ तुझें-च प्रिय करावें अशा इच्छेनें मी पंचवटींत राहीन. एखादे वेळीं तूं आणि लक्ष्मण दोघेहीजण मृगयेला गेलेत, ॥ ५ ॥ तर मी जानकीचें, होतील तितक्या प्रयत्नांनीं, संरक्षण करीन. ’ हें त्या गृध्राचें ( गिधाडाचें ) वचन ऐकिल्यावर रामचंद्र प्रेमळपणें त्याला ह्मणाला :–॥ ६ ॥ ‘ हे गृध्रराजा, फार चांगलें. तूं येथून कांहीं अंतरा-वर, मी राहीन त्या स्थलाच्या जवळपास, वनामध्यें राहून आपल्या इच्छेप्रमाणें माझें प्रिय करीत जा. ’

वधार्हो ऽहं न ते राम पितुस्ते ऽहं प्रियः सखा ॥ ३ ॥ जटायुर्नाम भद्रं ते गृध्रो ऽहं प्रियकृत्तव ॥ ४॥ पंचवट्यामहं वत्स्ये तवैव प्रियकाम्यया[2] ॥ मृगयायां कदाचित्तु प्रयाते लक्ष्मणे ऽपि च ॥ ५ ॥ सीता जनककन्या मे रक्षितव्या प्रयत्नतः॥ श्रुत्वा तद्गृध्रवचनं रामः सस्नेहमब्रवीत् ॥ ६ ॥ साधु गृध्रमहाराज तथैव कुरु मे प्रियम् ॥ अत्रैव मे समीपस्थो नातिदूरे वने वसन् ॥ ७ ॥

‘ राम, अहं ते वधार्हः न, अहं ते ( मू. ). ॥ ३ ॥ ते भद्रं; ( मू. ) प्रियकृत्. ॥ ४ ॥ अहं (पू.) वत्स्ये[1]. ॥ ( ५ उ. ) प्रयाते[3] [ सति ] ॥ ( ६ पू. ) रक्षितव्या. ’ ॥ रामः तत् गृध्रवचनं ( मू. ) – ॥ ५ ॥ ६ ॥ ‘ गृध्रमहाराज, साधु. तथैव (मू.) मे कुरु. ॥ ७ ॥

१ राहीन. २ प्रिय करण्याच्या इच्छेनें. ३ गेलेला.

॥ ७ ॥ अशा प्रकारें जटायूला उत्तम बोध करून व आलिंगन देऊन, प्रभु रामचंद्र सीता आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान पंचवटींत गेला. ॥ ८ ॥ गोदावरीच्या तीरीं पोंचल्यावर, त्यांनीं ( सीता–रामांनीं ) पंचवटी-मध्यें लक्ष्मणाकडून एक विस्तीर्ण मंदिर तयार करविलें. - कुशळ कारागिरीचीं कामें करण्यामध्येंही - लक्ष्मणाची बुद्धि उत्तम प्रकारें चालत असे. ॥ ९ ॥ तीं सर्वजणें गोदावरीच्या उत्तर तीरावर त्या मंदिरांत राहूं लागलीं. त्या मंदिराच्या भोंवतीं कळंब, फणस, आंबे, इत्यादि वृक्ष पुष्कळ होते; ॥ १० ॥ ह्या एकांत स्थलीं जनसमूहापासून उपसर्ग अगदीं होत नसे; तसेंच - अतिवृष्टि, अनावृष्टि, शारीरिक व्याधि - इत्यादि पीडाही नव्हत्या. तेथें, बुद्धिवान् लक्ष्मणाच्या साह्यानें जानकीच्या मनाला विनोद करीत ॥ ११ ॥ राम-

इत्यामन्त्रितमालिंग्य ययौ पञ्चवटीं प्रभुः ॥ लक्ष्मणेन सह भ्रात्रा सीतया रघुनन्दनः ॥ ८ ॥ गत्वा ते गौतमीतीरं पञ्चवट्या सुविस्तरम् ॥ मन्दिरं कारयामास लक्ष्मणेन सुबुद्धिना ॥९॥ तत्र ते न्यवसन्सर्वे गंगाया उत्तरे तटे ॥ कादम्बपनसाम्रादिफलवृक्षसमाकुले ॥१०॥ विविक्ते जनसम्बाधवर्जिते नीरुजस्थले ॥ विनोदयन् जनकजां लक्ष्मणेन विपश्चिता ॥ ११ ॥ अध्युवास सुखं रामो देवलोक इवामरः ॥

प्रभुः रघुनन्दनः (मू.) [ च ] सह पंचवटीं ययौ. ॥ ८ ॥ ते गौतमीतीरं गत्वा पंचवट्यां [ स्थिताः. तत्र रामः ] सुबुद्धिना लक्ष्मणेन ( मू. ). ॥ ९ ॥ (१० मू. ११ पू.) गंगायाः उत्तरे तटे न्यवसन्. ॥ विपश्चिता लक्ष्मणेन[सह]जनकजां विनोदयन ॥१०॥११॥ रामः देवलोके अमरः इव सुखं अध्युवास.॥

१चांगलें सांगितलें ज्याला, अशा. २राहिले. ३लोकांच्या गर्दीनें रहित, अशा. ४नाहीं त्रास जेथें, अशा स्थलीं. ५सुज्ञ अशा. ६राहिला.

त्यांचा नित्य क्रम.

चंद्र सुखानें राहिला. देवलोकीं देवाला जो आनंद असतो तसा - येथें रामाला होत असे. - लक्ष्मण प्रतिदिवशीं त्यांना कंद, मुळें, फळें इत्यादि ॥ १२ ॥ आणून देई. त्याचें अंतःकरण रामाची सेवा करण्याचे कामीं सदासर्वकाळ तत्पर असे. तो नित्य रात्रीं हातांत धनुष्यबाण घेऊन चोहोंकडे लक्ष्य ठेवून जागत बसे. ॥ १३ ॥ तीं तिघें प्रतिदिनीं गोदावरीच्या उदकांत स्नान करीत. सीतेला कोठें जाणें येणें झालें तर ती रामलक्ष्मणांच्या मध्यें चालत असे ( पुढें राम, मागें लक्ष्मण, अशा दोघांना बरोबर घेऊन जात येत असे ). ॥ १४ ॥ लक्ष्मण संतुष्ट अंतःकरणानें नित्य उदक आणून देऊन त्यांची सेवा करी. अशा रीतीनें तीं तिघें प्रतिदिनीं सुखासमाधानानें राहत. ॥ १५ ॥ एके प्रसंगीं परमेश्वर रामचंद्र एकांतांत स्वस्थ बसला असतां,

कन्दमूलफलादीनि लक्ष्मणोऽनुदिनं तयोः ॥१२॥ आनीय प्रददौ रामसेवातत्परमानसः ॥ धनुर्बाणधरो नित्यं रात्रौ जागर्ति सर्वतः ॥१३॥ स्नानं कुर्वन्त्यनुदिनं त्रयस्ते गौतमीजले ॥ उभयोर्मध्यगा सीता कुरुते च गमागमौ ॥ १४ ॥ आनीय सलिलं नित्यं लक्ष्मणः प्रीतमानसः ॥ सेवतेऽहरहः प्रीत्या एवमासन् सुखं त्रयः ॥१५॥ एकदा लक्ष्मणो राममेकान्ते समुपस्थितम् ॥

रामसेवातत्परमानसः लक्ष्मणः तयोः ( बा. १२ उ. १२ पू. ); ॥ धनुर्बाणधरः [ सन् ] ( मू. ) जागर्ति. ॥ १२ ॥ १३ ॥ ते त्रयः गौतमीजले अनुदिनं ( मू. ) कुरुते; ॥ १४ ॥ प्रीतमानसः लक्ष्मणः नित्यं सलिलं आनीय [3]अहरहः प्रीत्या सेवते; त्रयः एवं सुखं आसन्. ॥ १५ ॥ (पू.) रामं ॥

१ जागत असे. २ जाण्यायेण्याला. ३ प्रतिदिवशीं.

लक्ष्मणानें विनयपूर्वक नम्र होऊन त्याला विचारिलें :- ॥ १६ ॥ 'हे षड्गुणैश्वर्यसंपन्ना कमलदलनयना ईश्वरा, मोक्षप्राप्तीचें निश्चित कारण कोणतें ( ज्या मार्गानें गेलें असतां खात्रीनें मोक्ष मिळेल ) तें तुजपासून ऐकावें, अशी मला इच्छा झाली आहे; तर तें तूं संक्षेपानें मला सांगावेंस. ॥ १७ ॥ - मोक्षाला साधन ज्ञान होय, असें मला विदित आहे; पण त्या ज्ञानाचें स्वरूप काय, तें मी तुला विचारीत आहें. - वेदांतादिकांचें श्रवण व मनन करून ज्ञान संपादन करायाचें तें कोणतें, अपरोक्ष ज्ञान तें काय, आणि त्या ज्ञानाची वृद्धि करणारीं साधनें जीं भक्ति व वैराग्य, त्यांचीं स्वरूपें कशीं, तें सर्व मला सांग. रघुवीरा, तुझ्यावांचून अन्य वक्ता पृथ्वीतलावर कोणी नाहीं. ' ॥ १८ ॥ श्रीराम ह्मणाला :- " बाळा, ऐक. तुला गुह्यापेक्षां अत्यंत गुप्त गोष्ट

विनयावनतो भूत्वा पप्रच्छ परमेश्वरम् ॥१६॥ भगवन् श्रोतुमिच्छामि मोक्षस्यैकान्तिकीं गतिम् ॥ त्वत्तः कमलपत्राक्ष संक्षेपाद्वक्तुमर्हसि ॥ १७ ॥ ज्ञानं विज्ञानसहितं भक्तिवैराग्य¹बृंहितम् ॥ आचक्ष्व मे रघुश्रेष्ठ वक्ता नान्योऽस्ति भूतले ॥ १८ ॥ श्रीराम उवाच । शृणु वक्ष्यामि ते वत्स गुह्याद्गुह्यतरं परम् ॥ यद्विज्ञाय नरो जह्यात्सद्यो वै²कल्पिकं भ्रमम् ॥ १९ ॥

परमेश्वरं ( मू. ) - ॥ १६ ॥ ' भगवन्, त्वत्तः ( पू. ) श्रोतुं इच्छामि. ( मू. ). ॥ १७ ॥ रघुश्रेष्ठ, ( पू. ) ज्ञानं ॥ मे ( मू. ) भूतले अन्यः वक्ता न अस्ति. ' ॥ १८ ॥ श्रीरा० उवा० -- ' वत्स, ( पू. ) वक्ष्यामि. ॥ नरः (मू.) जह्यात्. ॥ १९ ॥

---

१ भक्ति, वैराग्य ह्यांनीं वाढविलेल्या. २ वास्तविक नव्हे ( वंध्येचा पुत्र, सशाचें शिंग ) अशा केवळ शाब्दिक व्यवहाराला.

सांगतों. - ' सशाचें शिंग, ' ' वंध्येचा पुत्र, ' हे शब्द नुसते उच्चारायाचे मात्र, त्यांचे वाच्य पदार्थ मुळींच नाहींत, - त्याप्रमाणेंच ' सृष्टि ' ह्या शब्दाचा प्रकार आहे. सृष्टि नुसता काल्पनिक भ्रम होय. मी सांगणार तें ज्ञान झालें ह्मणजे मनुष्याचा तो भ्रम तत्काळ दूर होतो. ॥ १९ ॥ प्रथम मी तुला मायेचें स्वरूप सांगतों, नंतर ज्ञानाचीं साधनें, पुढें शब्दज्ञान व तत्त्वज्ञान ॥ २० ॥ आणि शेवटीं ज्ञानाचा विषय परमात्मा हें सगळें सांगेन. ह्याचें ज्ञान झालें ह्मणजे मनुष्य संसारसागरांतून मुक्त होतो. शरीर आत्म्याहून भिन्न जड आहे. त्याच्या ( शरीराच्या ) ठिकाणीं ' हाच आत्मा ' अशी जी बुद्धि होते, ॥ २१ ॥ तीच माया होय. तिच्या योगानेंच हा संसार कल्पिला जातो. हे कुलभूषणा, मायेचीं दोन अनादि रूपें ठरलेलीं आहेत. ॥ २२ ॥ एक विक्षेप ( घोंटाळा, पसारा करणारें ),

आदौ मायास्वरूपं ते वक्ष्यामि तदनन्तरम् ॥ ज्ञानस्य साधनं पश्चाज्ज्ञानं विज्ञानसंयुतम् ॥ २० ॥ ज्ञेयं च परमात्मानं यज्ज्ञात्वा मुच्यते भयात् ॥ अनात्मनि शरीरादावात्मबुद्धि[1]स्तु या भवेत् ॥ २१ ॥ सैव माया तयैवासौ संसारः परिकल्प्यते[2] ॥ रूपे द्वे निश्चिते पूर्वं मायायाः कुलनन्दन ॥ २२ ॥ विक्षेपावरणे तत्र प्रथमं कल्पयेज्जगत् ॥ लिंगाद्यं[3]ब्रह्मपर्यंतं स्थूलसूक्ष्मविभेदतः ॥ २३ ॥

( मू. ) ज्ञानं ॥ २० ॥ ( पू. ) मुच्यते. ॥ ( मू. ), ॥ २१ ॥ (पू.). ॥ कुलनंदन, पूर्वं मायायाः विक्षेपावरणे द्वे रूपे निश्चिते. ( मू. ) जगत् स्थूलसूक्ष्मविभेदतः कल्पयेत्. ॥ २२ ॥ २३ ॥ ॥ २२ ॥

१ ' आत्मा ' असा समज. २ कल्पिला जातो. ३ महत्तत्त्वापासून ब्रह्मदेवापर्यंत.

रूप व दुसरें आवरण ( आच्छादन ) रूप. त्यांपैकीं पाहिलें ( विक्षेपरूप ) महत्तत्त्वापासून चतुर्मुख ब्रह्मदेवापर्यंत स्थूल सूक्ष्म ह्या भेदांचें जितकें ह्मणून जग आहे त्याची कल्पना करितें; ॥ २३ ॥ दुसरें ( आवरणरूप ) ज्ञानरूपाला आच्छादून राहिलें आहे. ती माया शुद्ध परमात्म्याच्या आधारावर ह्या सर्व विश्वाची कल्पना करिते ( सत्य स्वरूप आच्छादून जगद्रूप दाखविते ). ॥ २४ ॥ जसें, भ्रांतीमुळें दोरीवर सर्पाचा भास होतो ( तो सर्प खरा नव्हे, दोरी खरी ) - त्याप्रमाणें परमेश्वरावर मायेनें कल्पिलेलें जग सत्य नव्हे; परमात्मा सत्य होय. - असा विचार केला ह्मणजे संसार कांहीं नाहीं. मनुष्यांना नित्य जें कांहीं ऐकूं येतें, दिसतें किंवा आठवतें, ॥ २५ ॥ तें सगळें, स्वप्नांतील अथवा मनोराज्यांतील खटाटोपाप्रमाणें, मिथ्या होय. संसाररूप वृक्षाचें बळकट मूळ देह होय, असें ह्मटलें आहे. ॥ २६ ॥ त्या देहामुळें पुत्र, स्त्रिया इत्यादिकांचा संबंध घडतो. देह नसेल तर आत्म्याला पुत्रादिकांचा संबंध आहे काय ? - नाहींच. - ॥ २७ ॥

अपरं त्वखिलं ज्ञानरूपमावृत्य[1] तिष्ठति ॥ मायया कल्पितं विश्वं परमात्मनि केवले ॥ २४ ॥ रज्जौ भुजंगवद्भ्रान्त्या विचारे नास्ति किंचन ॥ श्रूयते[4] दृश्यते[5] यद्यत्स्मर्यते[6] वा नरैः सदा ॥ २५ ॥ असदेव हि तत्सर्वं यथा स्वप्नमनोरथौ ॥ देह एव हि संसारवृक्षमूलं दृढं स्मृतम् ॥ २६ ॥ तन्मूलः पुत्रदारादिबन्धः किं तेऽन्यथाऽऽत्मनः ॥ २७ ॥

( बा. २४ मू. ) भ्रांत्या रज्जौ[2] भुजङ्गवत्[3] कल्पितं. विचारे किंचन नास्ति. नरैः सदा यत् यत् (मू.), ॥२४॥२५॥ तत् सर्वं (पू.) [तथा] असत् एव॥(मू.)॥२६॥(मू.) अन्यथा, ते आत्मनः किम् ? ॥२७॥

१ वेष्टून. २ दोरीवर. ३ सर्पाप्रमाणें. ४ ऐकिलें जातें. ५ दिसतें. ६ आठवतें.

- पृथ्वी, उदक, तेज, वायु, आकाश - हीं पांच महाभूतें हा स्थूल देह होय; पांच सूक्ष्म भूतें, अहंकार, बुद्धि, दहा इंद्रियें ॥ २८ ॥ चैतन्याचें प्रतिबिंब आणि मन हा लिंग ( सूक्ष्म ) देह होय; मूलप्रकृति हा कारण देह : क्षेत्र असें नांव देतात तें ह्याच जडसमुदायाला. ह्याला देह अशीही संज्ञा आहे. - ह्यालाच अज्ञानी लोक - 'अहं ( मी, आत्मा )' असें समजतात. ॥ २९ ॥ ह्या जडसमुदायाहून जीव वेगळा आहे. तोच परमात्मा होय. त्याला जन्म आदिकरून सहा भावविकार नाहींत. त्या जीवाच्या तत्त्वस्वरूपाचें ज्ञान होण्याचीं साधनेंदेखील मीं सांगतों, ऐक. ॥ ३० ॥ जीव आणि परमात्मा हे एकाचेच पर्याय आहेत; ह्या उभयतांमध्यें भेदभाव नाहीं; तशीच त्याच्या स्वरूपाला इयत्ता ( मोजमाप किंवा मुदत ) नाहीं : - आतां, असें तत्त्वज्ञान होण्याचीं साधनें सांगतों :- मनुष्यानें ढोंग, हिंसा इत्यादि प्रकार सोडून द्यावे; ॥ ३१ ॥ दुसऱ्यानें निंदा वगैरे केली तरी सोसावी; सर्वांशीं सरळपणें

देहस्तु स्थूलभूतानां पञ्च तन्मात्रपञ्चकम् ॥ अहंकारश्च बुद्धिश्च इन्द्रियाणि तथा दश ॥ २८ ॥ चिदाभासो मनश्चैव मूलप्रकृतिरेव च ॥ एतत्क्षेत्रमिति ज्ञेयं देह इत्यभिधीयते ॥ २९ ॥ एतैर्विलक्षणो जीवः परमात्मा निरामयः ॥ तस्य जीवस्य विज्ञाने साधनान्यपि मे शृणु ॥ ३० ॥ जीवश्च परमात्मा च पर्यायो नात्र भेदधीः ॥ माना[2]भावस्तथा दम्भहिं[3]सादिपरिवर्जनम् ॥ ३१ ॥ पराक्षे[4]पादिसहनं सर्वत्रावक्र[5]ता तथा ॥

( मू. ) ॥ २८ ॥ २९ ॥ ( पू. ) परमात्मा. ( मू. ) ॥ ३० ॥ ( मू. ) ॥ ३१ ॥ ( मू. ) ॥ ॥ २३ ॥

१विकाररहित. २प्रमाण किंवा इयत्ता नाहीं. ३ढोंग, हिंसा इत्यादि सोडणें. ४दुसऱ्यांनीं केलेली निंदा वगैरे सोसणें. ५अवक्रता सरळपणा.

वागावें; मन, वाणी आणि शरीर ह्यांच्या योगानें उत्तम भक्तिपूर्वक सद्गुरूची सेवा करावी; ॥ ३२ ॥ शरीर आणि मन स्वच्छ राखावें; सदाचरणांत तत्परता ठेवावी; मन, वाणी आणि शरीर ह्यांना अन्याय करूं देऊं नये (दुसऱ्याचें अनिष्ट चिंतन न करणें, हें मनाचें नियमन; दुसऱ्याला अपशब्दांनीं न दुखावणें, हें वाणीला शिक्षण; हिंसा न करणें, हें शरीराचें दमन.); विषयांच्या इच्छा धरूं नये; ॥ ३३ ॥ अहंकार सोडावा; - लोकांना - जन्म, वार्धक्य इत्यादि दुःखें सोसावीं लागत आहेत, हें पाहून - संसाराविषयीं विरक्त व्हावें; - तसेंच, पुत्र, स्त्रिया, द्रव्य इत्यादिकांवर आसक्ति ठेवूं नये, प्रेम सोडून द्यावें; ॥ ३४ ॥ इष्ट किंवा अनिष्ट कसाही प्रसंग आला तरी चित्तवृत्ति नित्य सारखी ठेवावी; सर्वांचा अंतर्यामी जो मी राम, त्या मज-

मनोवाक्कायसद्भक्त्या[1] सद्गुरोः परिसेवनम् ॥ ३२ ॥ बाह्याभ्यन्तरसंशुद्धिः[2] स्थिरता सत्क्रियादिषु[3] ॥ मनोवाक्कायदण्डश्च[4] विषयेषु निरीहता[5] ॥ ३३ ॥ निरहंकारता जन्मजराद्यालोचनं[6] तथा ॥ असक्तिः स्नेहशून्यत्वं पुत्रदारधनादिषु ॥ ३४ ॥ इष्टानिष्टागमे नित्यं चित्तस्य समता तथा ॥ मयि सर्वात्मगे रामे ह्यनन्यविषया मतिः ॥ ३५ ॥

(मू.) ॥३२॥ (पू.) स्थिरता, ॥ (मू.) ॥ ३३ ॥ (मू.) असक्तिः, स्नेहँशून्यत्वं, ॥३४ ॥ (मू.), ॥३५॥

१ मन, वाणी, शरीर ह्यांनीं केलेल्या उत्तम भक्तीनें. २ शारीरिक व मानसिक शुद्धता. ३ सदाचरणाविषयीं. ४ मन, वाणी, शरीर ह्यांचा निग्रह. ५ निस्पृहपणा. ६ लोकांना जन्म, वार्धक्य वगैरे येतात हें पाहणें (विरक्त होणें). ७ कोणाशीं स्नेह न ठेवणें.

वर अनन्यभावें बुद्धि लावावी; ॥ ३५ ॥ जेथें लोकसमुदायापासून उपसर्ग लागणार नाहीं अशा ( एकांत ) शुद्ध स्थानीं बसावें; संसारी लोकसमाजाशीं प्रेम कधीं ठेवूं नये; ॥ ३६ ॥ आत्मज्ञानाचा सतत उद्योग चालवावा; वेदांताच्या अर्थाचें श्रवण व मनन करीत असावें; ह्या सांगितलेल्या साधनांच्या योगें ज्ञान प्राप्त होतें. ह्यांच्या विपरीत आचरण ठेविलें तर त्याचें फळ विपरीतच ( अज्ञान ) मिळतें. ॥ ३७ ॥ ‘ मी बुद्धि, प्राण, मन, शरीर, अहंकार, ह्यांहून वेगळा चैतन्यरूपी असून तिन्ही काळीं नष्ट न होणारा, परम पवित्र ज्ञानमयच आहें ’ अशा प्रकारच्या सिद्धांताचा ॥ ३८ ॥ ज्याच्या ( शब्दादिकांच्या ) उपदेशानें बोध होतो, तें ( शब्दादिक ) ज्ञान, असें मी निश्चयात्मक सांगतों; ह्याचाच ज्यावेळीं प्रत्यक्ष अनुभव येतो, तेव्हां तें

जनसम्बाधरहितशुद्धदेशनिषेवणम्[1] ॥ प्राकृतैर्जनसंघैश्च[2] ह्यरतिः सर्वदा भवेत् ॥ ३६ ॥
आत्मज्ञाने सदोद्योगो वेदान्तार्थावलोकनम् ॥ उक्तैरेतैर्भवेज्ज्ञानं विपरीतैर्विपर्ययः ॥ ३७ ॥ बुद्धिप्राणमनोदेहाहंकृतिभ्यो विलक्षणः ॥ चिदात्माऽहं नित्यशुद्धो बुद्ध एवेति निश्चयम् ॥ ३८ ॥ येन ज्ञानेन संवित्ते[3] तज्ज्ञानं निश्चितं च मे ॥
विज्ञानं च तदैवैतत्साक्षादनुभवेद्यदा ॥ ३९ ॥

(मू.) ॥ ३६ ॥ (मू.) भवेत्. ॥ ३७ ॥ अहं ( ३८ मू. ३९ पू. ) [ इति ] मे निश्चितं. ॥ यदा एतत् साक्षात् अनुभवेद्, तदा एव विज्ञानं [ इति उच्यते ]. ॥ ३८ ॥ ३९ ॥ 

१ लोकांच्या गर्दीनें रहित व शुद्ध देशांचा आदर करणें ( तशा देशांत राहणें ). २ लोकांच्या समुदायांशीं. ३ जाणतो.

तत्त्व ( अपरोक्ष ) ज्ञान होय. ॥ ३९ ॥ आत्मा सर्वत्र पूर्ण ज्ञानानंदरूपानें भरलेला आहे; त्याला उत्पत्त्यादि विकार नाहींत किंवा त्याच्या स्वरूपांत बदल होत नाहीं; त्याच्या ठिकाणीं बुद्धि, चित्त, अहंकार इत्यादिकांचे राग, द्वेष, लोभ, अहंभाव वगैरे धर्म नाहींत; त्याला रूपांतर, जडता इत्यादि नाहींत; ॥ ४० ॥ तो स्वतांच्या ज्ञानमय प्रकाशानें देहादिकांना प्रकाशित करितो; त्याच्या स्वरूपाला मर्यादा, आवरण, किंवा इयत्ता नाहीं; तो नित्य एकरूप व भेदभावरहित आहे; ' सत्य, ज्ञान, अनंत ' इत्यादि श्रुतींत सांगितलेलीं ब्रह्मरूपाचीं लक्षणें त्याचींच ( आत्म्याचीं ) होत. ॥ ४१ ॥ तो ( आत्मा ) कोणाशींही सक्त होत नाहीं; - सूर्याला कोणतीही वस्तु पाहण्यासाठीं दिवा घेण्याचें कारण नाहीं, त्याप्रमाणेंच - आत्म्याला स्वस्वरूपाच्या दर्शनासाठीं इतर साधनें लागत नाहींत; तो सर्व क्रिया किंवा वस्तु प्रत्यक्ष पाहतो. तत्त्वज्ञानाच्यायोगानें हें आत्मस्वरूप कळून येतें. प्राण्याला ज्यावेळीं सद्गुरूकडून महावाक्याचा उपदेश मिळून त्यायो-

आत्मा सर्वत्र पूर्णः स्याच्चिदानन्दात्मकोऽव्ययः॥ बुद्ध्याद्युपाधिरहितः परिणामादिवर्जितः ॥ ४० ॥ स्वप्रकाशेन देहादीन् भासयन्ननपावृतः[1]॥एक एवाद्वितियश्च सत्यज्ञानादिलक्षणः ॥ ४१॥ असंगः स्वप्रभो[2] द्रष्टा विज्ञानेनावगम्यते[3] ॥ आचार्यशास्त्रोपदेशादैक्यज्ञानं यदा भवेत् ॥ ४२ ॥ आत्मनोर्जीवपरयोर्मूलाविद्या तदैव हि ॥ लीयते[4] कार्यकरणैः सहैव परमात्मनि ॥ ४३ ॥

( मू. ) ॥ ४० ॥ ४१ ॥ ( बा. ४२ मू. ) जीवपरयोः आत्मनोः ऐक्यज्ञानं यदा भवेत्, तदा एव ( मू. ) लीयते; ॥ ४२ ॥ ४३ ॥

---

१ आच्छादित नसलेला. २ स्वयंप्रकाश. ३ जाणिला जातो. ४ लीन होते.

गानें जीवात्मा आणि परमात्मा ह्यांच्या ऐक्याचें ज्ञान होतें, त्यावेळींच संसाराचें मूळ कारण अविद्या आपलीं कार्यें ( स्थूल ) व इंद्रियें ह्यांसहवर्तमान परमात्म्याच्या स्वरूपीं लय पावते. ॥ ४२ ॥ ४३ ॥ ह्या अवस्थेला ‘ मुक्ति ’ असें ह्मणतात. हा सर्व आत्म्यावर उपचार ( कल्पिलेला आरोप ) आहेः किंवा हा आत्मज्ञानाचा मार्ग होय. रघुनंदना, शब्दज्ञान आणि तत्त्वज्ञान ह्यांसहित हें परमात्म्याचें स्वरूप तुला मी सांगितलें. तो परमात्मा मीच - अर्थात मोक्षावस्था माझेंच स्वरूप होय. - परंतु, माझी भक्ति करण्याविषयीं जे जन पराङ्मुख असतील त्यांना ह्या स्वरूपाची ( मोक्षाची ) प्राप्ति होणें दुर्घट आहे. ॥४४॥४५॥ डोळे असले तरी रात्रीं ( अंधारांत ) मनुष्याला, - चोर आला कोठून, गेला कोठें, - तें चांगलेंसें समजत नाहीं; पण बरोबर दिवा घेतला ह्मणजे त्यालाच सर्व पदार्थ यथास्थित दिसूं लागतात; ॥ ४६ ॥ त्याप्रमाणें

सा ऽवस्था मुक्तिरित्युक्ता ह्युपचारो ऽयमात्मनि॥ इदं मोक्षस्वरूपं ते कथितं रघुनन्दन ॥ ४४ ॥ ज्ञानविज्ञानवैराग्यसहितं मे परात्मनः ॥ किं त्वेतद्दुर्लभं मन्ये मद्भक्तिविमुखात्मनाम् ॥ ४५ ॥ चक्षुष्मतामपि यथा रात्रौ सम्यङ् न दृश्यते ॥ पदं दीपसमेतानां दृश्यते सम्यगेव हि ॥ ४६ ॥ एवं मद्भक्तियुक्तानामात्मा सम्यक् प्रकाशते ॥ मद्भक्तेः कारणं किंचिद्वक्ष्यामि शृणु तत्त्वतः ॥ ४७ ॥

( पू. ); आत्मनि अयं उपचारः. ॥ रघुनन्दन, ( ४५ पू. ४४ उ.). (मू.), दुर्लभं मन्ये. ॥४४॥४५॥ ( मू. ) [ दृश्यते, ] ॥ ४६ ॥ ( मू. ) वक्ष्यामि; शृणु. ॥ ४७ ॥

१ आरोपित धर्म. २ नेत्र आहेत ज्यांना, अशांना. ३ दिवा जवळ घेणारांना.

ज्यांच्या अंतरीं मजविषयीं भक्ति वसत असेल, त्यांना आत्मस्वरूपाचा स्पष्ट बोध होतो. माझ्यावर भक्ति बसण्याचीं थोडींशीं साधनें तुला यथार्थपणें सांगतों, ऐक :-॥ ४७ ॥ माझ्या भक्तांची संगत धरावी, माझी व माझ्या भक्तांची निरंतर सेवा करावी, एकादशीचें उपोषण इत्यादि धर्म पाळावे, रामनवमीसारख्या माझ्या उत्साहाच्या दिवशीं उत्सव करावे, ॥ ४८ ॥ माझ्या कथा ऐकण्यांत, वाचण्यांत, व सांगण्यांत नित्य रममाण असावें, माझी पूजा करण्यांत दक्षता राखावी, आणि माझ्या नामाचा जप करावा. ॥ ४९ ॥ अशा प्रकारें जे लोक निरंतर वागतात त्यांची मजवर निरंतर निश्चल भक्ति जडते. - एवढें झालें कीं - मग पुढें ज्ञानप्राप्तीचें साधन तें काय राहिलें ? - कांहीं नाहीं. - ॥ ५० ॥ ह्मणून मी सांगतों कीं, माझी भक्ति करणाराला वैराग्य, शब्दज्ञान व तत्त्वज्ञान तत्काळ प्राप्त होतें; त्यापासून मनुष्याला मुक्ति मिळते. ॥ ५१ ॥

मद्भक्तसंगो मत्सेवा मद्भक्तानां निरन्तरम् ॥ एकादश्युपवासादि मम पर्वानुमोदनम् ॥ ४८ ॥ मत्कथाश्रवणे पाठे व्याख्याने सर्वदा रतिः ॥ मत्पूजापरिनिष्ठा च मम नामानुकीर्तनम् ॥ ४९ ॥ एवं सततयुक्तानां भक्तिरव्यभिचारिणी[1] ॥ मयि संजायते नित्यं ततः किमवशिष्यते[2] ॥ ५० ॥ अतो मद्भक्तियुक्तस्य ज्ञानं विज्ञानमेव च ॥ वैराग्यं च भवेच्छीघ्रं ततो मुक्तिमवाप्नुयात्[3] ॥ ५१ ॥

(पू.) [ सेवा ], ॥ (मू.), ॥४८॥४९॥ (बा. मू.) मयि नित्यं भक्तिः (बा. पू.) ? ॥५०॥ (मू.) ॥५१॥

---

१ न ढळणारी. २ अवशिष्यते बाकी राहतें. ३ पावेल.

लक्ष्मणा, तुझ्या प्रश्नांप्रमाणें हें सर्व मी तुला सांगितलें. जो पुरुष ह्यावर मन ठेवून असतो, त्याला मुक्ति प्राप्त होते. ॥ ५२ ॥ माझी भक्ति करीत नसेल त्याला हें ज्ञान कधींही न सांगण्याविषयीं यत्न ठेवावा. माझ्या भक्ताला मुद्दाम हांका मारून बोलावूनही ह्याचा उपदेश करावा. ॥ ५३ ॥ जो मनुष्य विश्वास ठेवून भक्तिपूर्वक ह्या उपदेशाचा नित्य पाठ करितो, तो, स्वतांवर असलेला अज्ञानावरणरूपी अंधकार नाहींसा करून, मुक्त होतो. ॥ ५४ ॥ माझा भक्तियोग करणाऱ्या पुरुषांचीं अंतःकरणें अत्यंत पवित्र व अतिशय शांत असतात; त्यांच्या मनांला माझी सेवा करण्याची पराकाष्ठेची आवड असते; ते निर्मल आत्म-

कथितं सर्वमेतत्ते तव प्रश्नानुसारतः ॥ अस्मिन्मनः समाधाय[1] यस्तिष्ठेत्स तु मुक्तिभाक्[2] ॥ ५२ ॥ न वक्तव्यमिदं यत्नान्मद्भक्तिविमुखाय हि ॥ मद्भक्ताय प्रदातव्यमाहूय[3]ापि प्रयत्नतः ॥ ५३ ॥ य इदं तु पठेन्नित्यं श्रद्धाभक्तिसमन्वितः ॥ अज्ञान[4]पटलध्वान्तं विधूय[5] परिमुच्यते ॥ ५४ ॥ भक्तानां मम योगिनां सुविमल[6]-स्वान्तातिशान्तात्मनां मत्सेवा[7]भिरतात्मनां च विमलज्ञाना[8]त्मनां सर्वदा ॥

(पू.) सर्वं ते कथितं ( मू. ). ॥ ५२ ॥ (पू.) न वक्तव्यं. ॥ ( मू. ) प्रदातव्यम्. ॥५३॥ ( पू. ) यः इदं पठेत्, [ सः ] ( मू. ). ॥ ५४ ॥सदा उद्यतमतिः संत्सेवनानन्यधीः यः मम (पू.) ॥

---

१ ठेवून. २ मोक्ष पावणारा. ३ बोलावून. ४ अज्ञानरूपी पटलानें ( पडद्यानें ) केलेल्या अंधकाराला. ५ टाकून. ६ अत्यंत निर्मल मन ज्यांचें अशा, व अत्यंत शांत मन ज्यांचें अशा. ७माझी सेवा करण्यांत तत्पर मन ज्यांचें अशा. ८ शुद्ध ज्ञानरूप आत्मा हाच ज्यांचा जाणण्याचा विषय, अशा. ९ नित्य उद्युक्त बुद्धि ज्याची, असा. १० साधूंच्या सेवेशिवाय दुसरेकडे नाहीं बुद्धि ज्याची, असा.

रूपाचें ज्ञान संपादण्याचा नित्य यत्न करीत असतात. जो मनुष्य अशा भक्तांच्या समागमीं राहतो, ज्ञान मिळविण्याविषयीं आपल्या बुद्धीला उद्युक्त ठेवितो, व साधूंच्या सेवेशिवाय दुसऱ्या विषयाकडे बुद्धीची प्रवृत्ति होऊं देत नाहीं, त्याच्या मोक्ष अगदीं हातांत असतो; आणि मीही त्याला नित्य दर्शन देतों. इतर साधनांनीं मोक्षप्राप्ति किंवा माझें दर्शन मिळायाचें नाहीं. ॥ ५५ ॥ इति अरण्यकाण्डे चतुर्थः सर्गः ॥ ४ ॥

त्या वेळेला त्या विस्तीर्ण दंडकारण्यांत, जनस्थानीं राहणारी एक राक्षसी फिरत असे. तिला इच्छेस येईल तसें रूप घेतां येई; तिची शक्तिही फार मोठी होती. ॥ १ ॥ एकदां, गोदावरीच्या तीरीं पंचवटीजवळ पृथ्वीपतीचीं ( रामाचीं ) कमल, वज्र, अंकुश ह्या चिन्हांनीं युक्त अशीं ( उमटलेलीं ) पावलें ॥ २ ॥

संगं यः कुरुते सदोद्यतमतिः सत्सेवनानन्यधीर्मोक्षस्तस्य करस्थितोऽहमनिशं दृश्यो भवे नान्यथा ॥ ५५ ॥ इति श्रीम० उ० अरण्यकाण्डे चतुर्थः सर्गः ॥४ ॥

तस्मिन्काले महारण्ये राक्षसी कामरूपिणी ॥ विचचार महासत्त्वा जनस्थाननिवासिनी ॥ १ ॥ एकदा गौतमीतीरे पञ्चवट्याः समीपतः ॥ पद्मवज्रांकुशाकानि पदानि जगतीपतेः ॥ २ ॥

संगं कुरुते, तस्य ( बा. मू. ). ॥ ५५ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणान्वये अरण्यकाण्डे चतुर्थः सर्गः ॥४॥ ( मू. ) राक्षसी विचचार. ॥ १ ॥ ( मू. ) पदानि ॥ २ ॥

१ हातांत असलेला. २ इच्छेप्रमाणें रूप घेणारी. ३ मोठी शक्ति जिची, अशी. ४ जनस्थानीं ( हल्लीं, ज्याला ' नासिक ' म्हणतात, त्या स्थलीं ) राहणारी. ५ फिरत असे. ६ कमल, वज्र, अंकुश हीं चिन्हें ज्यांवर, अशा. ७ पृथ्वीच्या पतीचीं ( रामाचीं ).

तिच्या दृष्टीस पडलीं. तत्काल तिचें मन कामवासनेनें व्याप्त झालें! ती त्या पाउलांचें सौंदर्य पाहून वेडावून गेली, व त्या खुणांवरून पाहात पाहात ( सुगावा काढीत ) हळूहळू रामाच्या आश्रमीं आली. ॥ ३ ॥ तेथें मदनासारखा सुंदर लक्ष्मीपति प्रभु रामचंद्र सीतेसह बसला होता, त्याला पाहतांच तिची कामेच्छा अतिशय वाढली. ॥ ४ ॥ पुढें, त्या राक्षसीनें रामाला विचारिलें :– ' तूं कोणाचा कोण ? ह्या आश्रमांत जटा, वल्कलें इत्यादि - चिन्हांचा तापसी वेष - घेऊन कां राहिला आहेस ? तुला येथें राहून कोणती गोष्ट साध्य करणें आहे ? मला सांग. ॥ ५ ॥ मी राक्षसी असून, राक्षसांचा राजा महापराक्रमी जो रावण, त्याची बहीण

दृष्ट्वा कामपरीतात्मा[1] पादसौन्दर्यमोहिता[2] ॥ पश्यन्ती सा शनैरायाद्राघवस्य निवेशनम्[3] ॥ ३ ॥ तत्र सा तं रमानाथं सीतया सह संस्थितम् ॥ कन्दर्पसदृशं[4] रामं दृष्ट्वा कामविमोहिता ॥ ४ ॥ राक्षसी राघवं प्राह कस्य त्वं कः किमाश्रमे ॥ युक्तो जटावल्कलाद्यैः साध्यं किं ते ऽत्र मे वद ॥ ५ ॥ अहं शूर्पणखा नाम राक्षसी कामरूपिणी ॥ भगिनी राक्षसेन्द्रस्य रावणस्य महात्मनः ॥ ६ ॥

( पू.) ॥ सा शनैः पश्यंती [ सती ] ( मू. ) आयात्. ॥ ३ ॥ ( मू. ) ॥ ४ ॥ (मू.) – 'त्वं कस्य ? कः ? जटावल्कलाद्यैः युक्तः [ सन् ] आश्रमे किं [ वससि ? ] ते अत्र [ वासेन ] साध्यं किं ? तत् मे वद. ॥ ५ ॥ (पू.) अहं ( मू. ) रावणस्य भगिनी [ अस्मि ]. ॥ ६ ॥



१ कामानें व्याप्त मन जिचें, अशी. २ पायांच्या सौंदर्यानें मोहित झालेली. ३ आश्रमास. ४ मदनासारख्या.

आहें. माझें नांव शूर्पणखा. मला पाहिजे तसें रूप घेतां येतें. ॥ ६ ॥ माझा खर नांवाचा भाऊ आहे; त्याच्या जंवळ मी ह्या अरण्यांतच राहत असतें. राजानें मला हें सगळें अरण्य - देणगी ह्मणून - दिलें आहे. मी येथें मुनींचें भक्षण करून निर्वाह करित्यें. ॥ ७ ॥ तुझा वृत्तांत समजून घ्यावा अशी माझी इच्छा आहे. तूं उत्तम वक्ता असशील - असें वाटतें; तर मी विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें - मला सांग.' राम तिला ह्मणाला :– 'मी अयोध्येच्या राजाचा मुलगा आहें. माझें नांव राम. ॥ ८ ॥ ही सुंदरी जनकराजाची कन्या माझी पत्नी होय. हिचें नांव सीता. तो अति सुंदर पुरुष माझा धाकटा भाऊ लक्ष्मण. ॥ ९ ॥ हे त्रैलोक्यसुंदरि ! तुझें मी कोणतें काम करूं, तें सांग.' शूर्पणखा कामानें व्याकुळ झाली होती. मागें सांगि-

खरेण सहिता भ्रात्रा वसाम्यत्रैव[1] कानने ॥ राज्ञा दत्तं च मे सर्वं मुनिभक्षा[2] वसाम्यहम् ॥ ७॥ त्वां तु वेदितुम्[3]इच्छामि वद मे वदतां वर ॥ तामाह रामनामा ऽहमयोध्याधिपतेः सुतः ॥ ८ ॥ एषा मे सुन्दरी भार्या सीता जनकनन्दिनी ॥ स तु भ्राता कनीयान्मे लक्ष्मणो ऽतीव सुन्दरः ॥ ९ ॥ किं कृत्यं ते मया ब्रूहि कार्यं भुवनसुन्दरि ॥ इति रामवचः श्रुत्वा कामार्ता सा ऽब्रवीदिदम् ॥ १० ॥

खरेण भ्रात्रा सहिता [ अहं ] ( पू. ) वसामि[4]. ॥ राज्ञा सर्वं [ वनं ] मे दत्तं, ( मू. ) [ अत्र ] वसामि. ॥ ७ ॥ (पू.) मे वद. ' ॥ [ रामः ] तां आह – ' ( मू. ) [ अस्मि ]. ॥ ८ ॥ ( पू. ) मे भार्या. ॥ अतीवसुंदरः सः तु लक्ष्मणः मे कनीयान् भ्राता. ॥ ९ ॥ भुवनसुंदरि, ते किं कृत्यं मया कार्यं ब्रूहि. ' ॥ (मू.) अब्रवीत् – ॥ १० ॥

---

१ वनांत. २ ऋषींना खाणारी. ३ जाणण्यास. ४ राहत्यें. ५ धाकटा. ६ कामानें व्याकुळ.

रामाचें तिला उत्तर.

लेलें रामाचें भाषण ऐकिल्यावर ती त्याला असें ह्मणाली:– ॥१०॥ ‘ रामा, मजबरोबर चल. आपण पर्वताव- रील अरण्यांत विहार करूं. तुझे हे कमलासारखे डोळे ( सुस्वरूप ) - पाहून - मी कामपीडित झाल्यें आ- हें. माझ्यानें तुझा सोडून जाववत नाहीं.’ ॥ ११ ॥ रामचंद्रानें सीतेकडे कटाक्षानें पाहून हांसत हांसत शूर्पणखेला ह्मटलें:–‘ बाई ! ही शुभलक्षणा सीता माझी धर्मपत्नी आहे. कांहीं झालें तरी माझ्यानें हिला सोडणें होणार नाहीं. ॥ १२ ॥ तेव्हां, हे सुंदरि ! सवतीमत्सराच्या दुःखांत तूं मजजवळ राहशील कशी ? बाहेर माझा भाऊ लक्ष्मण आहे. तो अतिसुंदर पुरुष ॥ १३ ॥ तुला योग्य पति होईल. जा; त्याच्याबरोबर-

एहि राम मया सार्धं रमस्व गिरि[1]कानने ॥ कामार्ता ऽहं न शक्नोमि त्यक्तुं त्वां कमलेक्षणम् ॥११॥ रामः सीतां कटाक्षेण पश्यन् सस्मितमब्रवीत् ॥ भार्या ममैषा कल्याणी विद्यते ह्यन[2]पायिनी ॥ १२ ॥ त्वं तु साप[3]त्न्यदुःखेन कथं [4]स्थास्यसि सुन्दरि ॥ बहिरास्ते मम भ्राता लक्ष्मणो ऽतीवसुन्दरः॥ १३ ॥ तवानु[5]रूपो भविता पतिस्तेनैव संचर ॥ इत्युक्ता लक्ष्मणं प्राह पतिर्मे भव सुन्दर ॥ १४ ॥

‘ राम, (पू.) रमस्व. ॥ ( मू. ) त्वां त्यक्तुं न शक्नोमि. ’ ॥ ११ ॥ ( पू. ) – ‘ ( मू. ) भार्या वि- द्यते. ॥ १२ ॥ सुंदरि, ( पू. ) ? ॥ ( मू. ) लक्ष्मणः आस्ते; ॥ १३ ॥ (पू.) [6]भविता; तेन एव सं- चर. ’ ॥ ( मू. ) – ‘ सुंदर, मे पतिः भव. ॥ १४ ॥



१ पर्वतावरील अरण्यांत. २ न सोडण्याजोगी. ३ सवतीमत्सराच्या दुःखानें. ४ राहशील. ५ योग्य. ६ होईल.

च वनविहार कर.' रामानें असें सांगितलें; तेव्हां ती राक्षसी लक्ष्मणाकडे गेली व त्याला ह्मणाली:–' हे सुंदर पुरुषा, माझा पति हो. ॥ १४ ॥ भावाची आज्ञा मान्य करून आपण आतां एकमेकांच्या समागमाचें[1] सुख घेऊं. विलंब लावूं नकोस.' कामवासनेनें मोहित झालेल्या त्या राक्षसीनें लक्ष्मणाला असें ह्मटलें. ॥ १५ ॥ तेव्हां लक्ष्मणानें तिला सांगितलें :–' हे साध्वि, मी त्या चतुर पुरुषाचा ( रामाचा ) सेवक आहें; अर्थांत तूंही त्याची दासी होशील. जगामध्यें लोकाचें दास्य करण्यापलिकडे अधिक दुःख तें कोणतें बरें आहे ? ( दास्य हें सर्व दुःखांचें स्थान होय ). ॥ १६ ॥ ह्मणून, मी तुला सांगतों कीं, तूं त्याच्याकडेच जा. तुझें कल्याण होवो. तो राजा असून सर्वेश्वर आहे.' शूर्पणखा राक्षसीचें अंतःकरण दुष्ट होतें. लक्ष्मणाचें भाषण ऐकिल्यावर ती पुन्हां रामाकडे आली ॥ १७ ॥ व क्रोधानें - त्याला ह्मणाली:-

भ्रातुराज्ञां पुरस्कृत्य संगच्छावो[1]ऽद्य मा चिरम् ॥ इत्याह राक्षसी घोरा लक्ष्मणं काममोहिता ॥ १५ ॥ तामाह लक्ष्मणः साध्वि दासोऽहं तस्य धीमतः[2] ॥ दासी भविष्यसि त्वं तु ततो दुःखतरं[3] नु किम् ॥ १६ ॥ तमेव गच्छ भद्रं ते स तु राजाऽखिलेश्वरः[4] ॥ तच्छ्रुत्वा पुनरप्यागाद्राघवं दुष्टमानसा ॥ १७ ॥ क्रोधाद्राम किमर्थं मां भ्रामयस्यनवस्थितः[5] ॥

घोरा काममोहिता राक्षसी लक्ष्मणं ' अद्य (मू.)' इति आह. ॥ १५ ॥ लक्ष्मणः (पू.) दासः ॥ त्वं (मू.) ? ॥१६॥ ( मू. ) राघवं आगात्, ॥१७॥ क्रोधात् [आह]– ' राम, अनवस्थितः [त्वं] (पू.)?॥

१ समागम पावूं. २ विद्वानाचा. ३ अधिक दुःखकारक. ४ सर्व जगाचा धनी. ५ स्थिर नसणारा ( चंचल ). ६ फिरवतोस.

शूर्पणखेची
विटंबना.

‘ रामा, तुझ्या बोलण्यांत स्थिरता किंवा खरेपणा - कांहींच दिसत - नाहीं. अरे! मला इकडून तिकडे विनाकारण फिरायाला कां लावीत आहेस? - जिच्या प्रेमास्तव मला असें फिरत लाविलेंस - त्या सीतेला मी आतांच येथें तुझ्या पुढें खाऊन टाकित्यें!’ ॥ १८ ॥ असें बोलून ती अक्राळ विक्राळ स्वरूपाची राक्षसी सीतेच्या आंगावर धांवली! तेव्हां - लक्ष्मणानें - रामाच्या आज्ञेवरून खड्ग उचलिलें आणि त्या राक्षसीला धरून ॥ १९ ॥ तिचें नाक व कान कापून टाकिले! लक्ष्मणाची शक्ति असामान्य होती. त्या वेळीं शूर्पणखेनें भयंकर किंकाळी फोडिली! तिचें शरीर रक्तानें भरून गेलें! लागलीच ॥ २० ॥ ती ओरडत ओरडत व खर राक्षसावर अपशब्दांचा भडिमार करीत त्याच्या पुढें जमिनीवर गडबडां लोळत पडली. खराचा शब्द तिच्या शब्दापेक्षांही कठोर होता. त्यानें शूर्पणखेला विचारिलें:—‘ हें काय? ॥ २१ ॥

इदानीमेव तां सीतां भक्षयामि तवाग्रतः ॥ १८ ॥ इत्युक्त्वा विकटाकारा[1] जानकीमनुधावती[2] ॥ ततो रामाज्ञया खड्गमादाय परिगृह्य[3] ताम् ॥ १९ ॥ चिच्छेद नासां[5] कर्णौ च लक्ष्मणोऽलघुविक्रमः[4] ॥ ततो घोरध्वनिं कृत्वा रुधिराक्तवपुर्द्रुतम्[7] ॥ २० ॥ क्रन्दमाना[8] पपाताग्रे खरस्य परुषाक्षरा[9] ॥ किमेतदिति तामाह खरः खरतराक्षरः ॥ २१ ॥

(मू.) भक्षयामि.’ ॥१८॥ (पू.) [बभूव]. ॥(मू.) परिगृह्य, ॥१९॥ अलघुविक्रमः लक्ष्मणः (पू.) चिच्छेद[6].॥ (मू.) ॥२०॥ (पू.) खरस्य अग्रे पपात. ॥ खरतराक्षरः[10] खरः तां इति आह – ‘किं एतत्? ॥ २१ ॥

---

१ भयंकर रूप जिचें अशी. २ आंगावर धांवणारी. ३ धरून. ४ नाहीं लहान पराक्रम ज्याचा, असा (पराक्रमी). ५ नाकाला. ६ तोडिता झाला. ७ रक्तानें भरलें शरीर जिचें, अशी. ८ ओरडणारी. ९ कठोर शब्द जिचा, अशी. १० अधिक कठोर शब्द ज्याचा असा.

तुझी अशी दुर्दशा केली कोणी ? आपण होऊन मृत्यूच्या मुखांत उडी घालण्यास असा कोणता प्राणी सिद्ध झाला आहे, तें मला सांग; ह्मणजे तो प्रत्यक्ष कृतांतासारखा असला तरी देखील मी त्याचा एका क्षणांत वध करीन.' ॥ २२ ॥ राक्षसी त्याला ह्मणाली :–' रामचंद्र - ह्या नांवाचा एक मनुष्य - सीता आणि लक्ष्मण ह्या दोघांना बरोबर घेऊन, दंडकारण्य निर्भय करण्यासाठीं गोदावरीच्या तीरीं राहत आहे. ॥२३॥ त्याच्या सांगण्यावरूनच त्याच्या भावानें माझी अशी अवस्था केली. खरा ! जर तूं कुलीन ( ज्या कुलांत जन्मास आलास त्याचा अभिमानी) व वीर असशील, तर ह्या शत्रूंचा वध करशील. ॥२४॥ मी - असा निश्चय केला

केनैवं कारिता ऽसि त्वं मृत्योर्वक्त्रानुवर्तिना॥वद मे तं वधिष्यामि कालकल्पमपि क्षणात् ॥ २२ ॥ तमाह राक्षसी रामः सीतालक्ष्मणसंयुतः ॥ दण्डकं निर्भयं कुर्वन्नास्ते गोदावरीतटे ॥ २३ ॥ मामेवं कृतवांस्तस्य भ्राता तेनैव चोदितः ॥ यदि त्वं कुलजातो ऽसि वीरो ऽसि जहि तौ रिपू ॥२४॥तयोस्तु रुधिरं पास्ये भक्षये तौ सुदुर्मदौ ॥ नो चेत्प्राणान्परित्यज्य यास्यामि यमसादनम् ॥ २५ ॥

( पू. ) केन एवं कारिता असि ? [ तत् ] मे वद. क्षणात् कालकल्पं अपि ( मू. ). ' ॥२२॥ राक्षसी तं आह – ' ( पू. ) रामः ॥ ( मू. ) आस्ते; ॥ २३ ॥ ( पू. ) [ सन् ] मां एवं कृतवान्. ॥ (मू.) [ तर्हि ] तौ रिपू जहि. ॥ २४ ॥( पू. ) भक्षये. ॥ (मू.) यास्यामि. ' ॥ २५ ॥

१ तोंडांत चालून जाणाऱ्या. २ करविलेली. ३ यमासारख्या. ४ मारीन. ५ प्रेरिलेला. ६ शत्रूंना. ७ मार. ८ रक्ताला. ९ पिईन. १० खाईन. ११ यमाच्या घरीं. १२ जाईन.

आहे कीं, - रामलक्ष्मणांचें रक्त पिईन आणि त्या अत्यंत उन्मत्त मानवांना खाऊन टाकीन; हें न घडेल तर प्राण देऊन यमाच्या घरीं जाईन ( मरेन ) ! ' ॥ २५ ॥ तें ऐकतांच खर क्रोधानें खवळून गेला. त्यानें तत्काल महाक्रूर कर्मे करणारे चौदा हजार राक्षस ॥ २६ ॥ रामाच्या आंगावर पाठविले; व त्याचा वध करण्याच्या इच्छेनें खर, त्रिशिरा, आणि दूषण राक्षस ॥ २७ ॥ असे सर्वजण लागलेच अनेक प्रकारचीं आयुधें घेऊन सज्ज होऊन रामाकडे आले. त्यांची गडबड कानीं पडतांच राम लक्ष्मणाला ह्मणाला :-- ॥ २८ ॥ 'लक्ष्मणा, मोठा कलकलाट ऐकूं येत आहे; ह्यावरून निःसं-

तच्छ्रुत्वा त्वरितं प्रागात्खरः क्रोधेन मूर्छितः ॥ चतुर्दश सहस्राणि रक्षसां भीमकर्मणाम् ॥ २६ ॥ चोदयामास रामस्य समीपं वधकांक्षया ॥ खरश्च त्रिशिराश्चैव दूषणश्चैव राक्षसः ॥ २७ ॥ सर्वे रामं ययुः शीघ्रं नानाप्रहरणोद्यताः ॥ श्रुत्वा कोलाहलं तेषां रामः सौमित्रिमब्रवीत् ॥ २८॥ श्रूयते विपुलः शब्दो नूनमायान्ति राक्षसाः ॥ भविष्यति महद्युद्धं नूनमद्य मया सह ॥ २९ ॥

( पू. ) [ सन ] त्वरितं प्रागात्, ॥ भीमकर्मणां रक्षसां ( मू. ) ॥ २६ ॥ (पू.) चोदयामास. ॥ ( मू. ) ॥ २७ ॥ सर्वे ( पू. ) [ संतः ] रामं शीघ्रं ययुः. ॥ रामः तेषां कोलाहलं ( मू. ) - ॥ २८ ॥ विपुलः शब्दः ( पू. ) आयान्ति ! नूनं अद्य मया सह महत् युद्धं भविष्यति ! ॥ २९ ॥

१ व्यापलेला. २ भयंकर कर्मे ज्यांचीं, अशा. ३ राक्षसांच्या. ४ वधाच्या इच्छेनें. ५ अनेक प्रकारांचीं आयुधें घेऊन सिद्ध. ६ कल्होळाला. ७ ऐकूं येतो. ८ येतात.

शय राक्षस इकडे येत असावे. त्यांचें आज मजबरोबर तुमुल युद्ध होणार, ह्यांत संदेह नाहीं. ॥ २९ ॥ तूं महापराक्रमी आहेस. - पण मी तुला सांगतों कीं, ह्या वेळीं - तूं सीतेला घेऊन गुहेंत जाऊन तेथें बस. माझ्या मनांत, ह्या सगळ्या घोररूपी राक्षसांचा वध करावा, अशी इच्छा आहे. ॥ ३० ॥ ह्यावर आतां कांहीं बोलूं नकोस; तुला माझी शपथ आहे !' लक्ष्मण 'बरें आहे' असें ह्मणून सीतेला घेऊन गुहेंत गेला. ॥ ३१ ॥ प्रभु रामानें घट्ट कमर बांधिली, धनुष्य हातीं घेतलें, अक्षय बाणांनीं भरलेले दोन्ही भाते पाठीवर अडकाविले, अशा रीतीनें सर्व तयारी केली. ॥ ३२ ॥ इतक्यांत राक्षस येऊन रामावर विचित्र आयुधें, पा-

सीतां नीत्वा गुहां गत्वा तत्र तिष्ठ महाबल ॥ हन्तुमिच्छाम्यहं सर्वान् राक्षसा-
न् घोररूपिणः ॥ ३० ॥ अत्र किंचिन्न वक्तव्यं शापितो ऽसि ममोपरि ॥ तथेति
सीतामादाय लक्ष्मणो गह्वरं[2] ययौ ॥ ३१ ॥ रामः परिकरं[3] बद्ध्वा धनुरादाय निष्ठुरम् ॥
तूणीरावक्षयशरौ बद्ध्वा यत्तो ऽभवत्प्रभुः ॥ ३२ ॥ तत आगत्य रक्षांसि रामस्यो-
परि चिक्षिपुः ॥ आयुधानि विचित्राणि पाषाणान्पादपानपि ॥ ३३ ॥

महाबल, (पू.) ॥ (मू.) राक्षसान् हन्तुं इच्छामि. ॥ ३० ॥ (पू) शापितः[1] असि. ' ॥ (मू.). ॥ ३१ ॥ प्रभुः (पू.) धनुः आदाय, ॥ अक्षयशरौ (मू.). ॥ ३२ ॥ ततः रक्षांसि आगत्य रामस्य उपरि विचित्राणि (मू.) चिक्षिपुः. ॥ ३३ ॥

१ शपथ घातलेला. २ गुहेंत. ३ कांचाला. ४ सिद्ध. ५ वृक्षांप्रत. ६ फेंकिते झाले.

अ-रा-बो.
सप्र. सान्व.
सटिप्पण.
॥ ३१ ॥



षाण व वृक्ष ह्यांचा वर्षाव करीत सुटले. ॥ ३३ ॥ रामानेंही सहज एका क्षणांत त्या आयुधादिकांचे तिळा-एवढाले तुकडे केले आणि नंतर एक हजार बाण सोडून सर्व राक्षसांचा धुवा उडविला. ॥ ३४ ॥ शेवटीं रघुवीरानें खर, त्रिशिरा, दूषणराक्षस ह्या सर्वांचा एका चार घटकांतच वध करून टाकिला. ॥ ३५ ॥ लक्ष्मणानेंही सीतेला गुहेंतून बाहेर आणून रामाच्या स्वाधीन केलें. रामानें सगळे राक्षस मारिले, असें पाहून त्याला आश्चर्य वाटलें. ॥ ३६ ॥ सीतेचें मुखकमल प्रसन्न झालें. त्या जनककन्येनें रामाला आलिंगन दिलें व त्याच्या शरीरावरील शस्त्रांचे व्रण धुतले. ॥ ३७ ॥ इकडे, मोठमोठाले सर्व राक्षस मेले, असें पाहिल्यावर

तानि चिच्छेद रामोऽपि लीलया तिलशः क्षणात् ॥ ततो बाणसहस्रेण हत्वा तान् सर्व-राक्षसान् ॥ ३४ ॥ खरं त्रिशिरसं चैव दूषणं चैव राक्षसम् ॥ जघान प्रहरार्धेन सर्वा-नेव रघूत्तमः ॥ ३५ ॥ लक्ष्मणोऽपि गुहामध्यात्सीतामादाय राघवे ॥ समर्प्य राक्षसा-न्दृष्ट्वा हतान्विस्मयमाययौ ॥३६॥ सीता रामं समालिंग्य प्रसन्नमुखपंकजा॥शस्त्रव्र-णानि चांगेषु ममार्ज जनकात्मजा॥३७॥सा ऽपि दुद्राव दृष्ट्वा तान्हतान् राक्षसपुंगवान्॥

(पू.) तानि तिलशः चिच्छेद ॥ (मू.) हत्वा [स्थितः]. ॥ ३४ ॥ रघूत्तमः (मू.) प्रहरार्धेन जघान. ॥ ३५ ॥ ( मू. ) दृष्ट्वा विस्मयं आययौ. ॥ ३६ ॥ प्रसन्नमुखपंकजा जनकात्मजा सीता ( पू. ) ॥ अंगेषु ( मू. ). ॥ ३७ ॥ (पू.) हतान् दृष्ट्वा दुद्राव. ॥ 

१ अर्ध्या प्रहरानें. २ मारिता झाला. ३ अवयवांवर. ४ शस्त्रांच्या व्रणांना. ५ धुती झाली. ६ मोठ्या राक्षसांना. ७ पळाली.

रावणाची बहीण शूर्पणखा लंकेंत गेली आणि ओरडत ओरडत सभेंत जाऊन रावणाच्या पायांजवळ भूमीवर लोळत पडली. आपली बहीण भयानें विव्हळ झाली आहे, असें पाहून, रावण तिला ह्मणाला :– ॥ ३८ ॥ ॥ ३९ ॥ 'बाळे, ऊठ, बसली रहा. हें तुझ्या सुंदर रूपाचें विरूप केलें कोणी ? इंद्रानें, यमानें, वरुणानें, ॥ ४० ॥ किंवा कुबेरानें ? नांव सांग. ह्मणजे एका क्षणांत त्याचें भस्म करून टाकितों !' राक्षसीनें त्याला उत्तर दिलें:–'उन्मत्ता, तुझी बुद्धि ( अक्कल ) अगदीं मंद झाली ! ॥ ४१ ॥ मला तर, तूं मद्य पिऊन धुंद झालेला, बायकोच्या अगदीं स्वाधीन व सर्वथा नपुंसकासारखा आहेस, असें वाटतें. राजाचे नेत्र

लंकां गत्वा सभामध्ये क्रोशन्ती पादसन्निधौ ॥३८॥ रावणस्य पपातोर्व्यां भगिनी तस्य रक्षसः ॥ दृष्ट्वा तां रावणः प्राह भगिनीं भयविह्वलाम् ॥ ३९ ॥ उत्तिष्ठोत्तिष्ठ वत्से त्वं विरूपकरणं तव ॥ कृतं शक्रेण वा भद्रे यमेन वरुणेन वा ॥४० ॥ कुबेरेणाथ वा ब्रूहि भस्मीकुर्यां क्षणेन तम् ॥ राक्षसी तमुवाचेदं त्वं प्रमत्तो विमूढधीः ॥४१॥ पानासक्तः स्त्रीविजितः षण्ढः सर्वत्र लक्ष्यसे ॥

तस्य रक्षसः भगिनी क्रोशन्ती [ सती ] लंकां गत्वा सभामध्ये रावणस्य पादसन्निधौ उर्व्यां पपात. रावणः तां भयविह्वलां भगिनीं दृष्ट्वा प्राह – ॥ ३८ ॥ ३९ ॥ 'वत्से, भद्रे, त्वं उत्तिष्ठ ! उत्तिष्ठ ! ( मू. ) कृतं ? ॥ ४० ॥ अथवा कुबेरेण कृतं ? ब्रूहि. तं क्षणेन भस्मीकुर्यां.' ॥ राक्षसी तं इदं उवाच – '( मू. ) [ असि ] ! ॥ ४१ ॥ त्वं ( मू. ) ! ॥

१ ओरडणारी. २ पायांजवळ. ३ धरणीवर. ४ इंद्रानें. ५ मद्य पिण्यांत दंग. ६ बायकोनें जिंकलेला. ७ नपुंसक.

ह्मटले ह्मणजे चार ( हेर ) होत : ते तुझ्याजवळ मुळींच नाहींत; तर तूं राज्य करणार कसलें ! ॥ ४२ ॥ खर, दूषण तसाच त्रिशिरा ह्यांचा युद्धांत वध झाला ! मोठमोठाले चवदा हजार राक्षस ॥ ४३ ॥ क्षणमात्रांत रामानें मारून टाकिले ! राक्षसांना तो प्रबल शत्रु उत्पन्न झाला आहे ! त्यानें सगळें जनस्थान ऋषींना राहण्याजोगें निर्भय करून सोडिलें ! हा वृत्तांत तुला अद्याप कांहींच कळला नाहीं, तेव्हां मला तुला - नुसता मूर्ख नाहीं - शतमूर्ख ह्मणावें लागत आहे !' ॥ ४४ ॥ रावण ह्मणाला :— 'शूर्पणखे ! राम हा आहे कोण, त्यानें राक्षस कां व कसे मारिले, तें सर्व मला नीटपणें सांग. ह्मणजे मी त्याचा आणि त्याच्या सा-

चारचक्षुर्[1]विहीनस्त्वं कथं राजा भविष्यसि ॥ ४२ ॥ खरश्च निहतः संख्ये दूषणस्त्रिशिरास्तथा ॥ चतुर्दश सहस्राणि राक्षसानां महात्मनाम् ॥ ४३ ॥ निहतानि क्षणेनैव रामेणासुरशत्रुणा ॥ जनस्थानमशेषेण मुनीनां निर्भयं कृतम् ॥ न जानासि विमूढस्त्वमत एव मयोच्यसे ॥ ४४ ॥ रावण उवाच । को वा रामः किमर्थं वा कथं तेनासुरा हताः ॥ सम्यक्कथय मे तेषां मूल[3]घातं करोम्यहम् ॥ ४५ ॥

(मू.) ! ॥ ४२ ॥ असुरशत्रुणा रामेण संख्ये[2] ( ४३ पू. ) तथा महात्मनां राक्षसानां चतुर्दशसहस्राणि क्षणेन एव निहतानि. ( ४४ द्वि. ) त्वं ( मू. ) विमूढः उच्यसे. ॥ ४३ ॥ ४४ ॥ रा० उ० - 'रामः कः वा ? तेन (पू.) ! ॥ मे सम्यक् कथय. अहं (मू.).' ॥ ४५ ॥

[1] हेर - ही राजांची - दृष्टि होय, तिनें रहित. [2] युद्धांत. [3] मूळाच्या नाशाला.

थींदारांचा समूळ नाश करून टाकितों.' ॥ ४९ ॥ शूर्पणखेनें सांगितलें :–' राजा, एकदां मी जनस्थानांतून फिरत फिरत गोदावरीच्या तीरीं गेल्यें होत्यें. त्या ठिकाणीं पंचवटी नांवाचा एक प्रदेश आहे. तेथें पूर्वी पुष्कळ ऋषि राहत असत. ॥ ४६ ॥ त्या आश्रमांत रामचंद्र माझ्या दृष्टीस पडला. त्याचे नेत्र कमळासारखे आहेत; तो हातांत धनुष्य बाण धारण करितो; मूळचा तेजस्वी असल्यामुळें जटा आणि वल्कलें ह्यांच्या योगानें त्याला अधिक शोभा आली आहे. ॥ ४७ ॥ त्याचा धाकटा भाऊ लक्ष्मण देखील अगदीं त्याच्यासारखा दिसतो. रामाची भार्या इतकी सुंदर आहे कीं ती प्रति लक्ष्मीच असावी असें वाटतें; तिचे नेत्र विशाल आहेत; ॥ ४८ ॥ देव, गंधर्व, नाग, किंवा मनुष्य

शूर्पणखोवाच। जनस्थानादहं याता कदाचिद्गौतमीतटे ॥ तत्र पञ्चवटी नाम पुरा मुनिजनाश्रया ॥ ४६ ॥ तत्राश्रमे मया दृष्टो रामो राजीवलोचनः ॥ धनुर्बाणधरः श्रीमान् जटावल्कलमण्डितः ॥ ४७ ॥ कनीयाननुजस्तस्य लक्ष्मणोऽपि तथाविधः ॥ तस्य भार्या विशालाक्षी रूपिणी श्रीरिवापरा ॥ ४८ ॥ देवगन्धर्वनागानां मनुष्याणां तथाविधा ॥ न दृष्टा न श्रुता राजन्द्योतयन्ती वनं शुभा ॥ ४९ ॥

शू० उ० – अहं (पू.) याता. ॥ तत्र पुरा मुनिजनाश्रया (मू.) [ अस्ति ]. ॥ ४६ ॥ (मू.) रामः दृष्टः. ॥ ४७ ॥ तस्य (पू.) लक्ष्मणः अपि [ दृष्टः ]. ॥ (मू.) श्रीः इव भार्या [ अस्ति ]. ॥ ४८ ॥ राजन, वनं द्योतयन्ती शुभा तथाविधा [ स्त्री ] (मू.). ॥ ४९ ॥

१ प्रकाशविणारी.

ह्यांच्यामध्यें असली स्त्री आजपर्यंत कोणाच्या पाहण्यांतही नाहीं, किंवा ऐकण्यांतही नाहीं; राजा, त्या सुंदरीचें अरण्यांत तेज फांकलें आहे! ॥ ४९ ॥ हे वीरा, त्या स्त्रीला तुझी पत्नी करण्यासाठीं आणावें, अशा उद्योगांत मी होत्यें. पण रामाच्या लक्ष्मणनामक बंधूनें रामाच्या सांगण्यावरून माझें नाक व कान कापिले. त्याची शक्ति इतकी मोठी आहे - कीं त्याच्यापुढें माझें कांहीं चालेना! - मग मी अत्यंत दुःखानें रडत रडत खराकडे गेल्यें. ॥ ५० ॥ ५१ ॥ त्यानेंही बरोबर राक्षसांचे अनेक सेनापति घेऊन रामावर चालून जाऊन त्याच्याशीं युद्ध केलें. पण रामाची शक्ति फारच विलक्षण! त्यानें तत्काल एका क्षणांतच ॥ ५२ ॥ सगळे राक्षस मारून टाकिले! ते राक्षस - कांहीं कमी होते असें नाहीं, - महापराक्रमी होते!

आनेतुमहमुद्युक्ता तां भार्यार्थे तवानघ ॥ लक्ष्मणो नाम तद्भ्राता चिच्छेद मम नासिकाम्॥५०॥कर्णौ च नोदितस्तेन रामेण स महाबलः ॥ ततो ऽहमतिदुःखेन रुदती खरमन्वगाम् ॥ ५१ ॥ सो ऽपि रामं समासाद्य युद्धं राक्षसयूथपैः ॥ ततः क्षणेन रामेण तेनैव बलशालिना ५२ ॥ सर्वे तेन विनष्टा वै राक्षसा भीमविक्रमाः ॥ यदि रामो मनः कुर्यात्त्रैलोक्यं निमिषार्धतः ॥ ५३ ॥

अनघ, अहं तव भार्यार्थं तां (पू.). ॥ तेन रामेण चोदितः सः महाबलः ( बा. ५० उ. ) कर्णौ च चिच्छेद. ( ५१ मू. ). ॥ ५० ॥ ५१ ॥ ततः सः अपि क्षणेन राक्षसयूथपैः [ सह ] रामं समासाद्य, बलशालिना तेन एव रामेण युद्धं [ अकरोत् ]. ॥ ५२ ॥ तेन (पू.) राक्षसाः विनष्टाः. (मू.) ॥५३॥ ॥३३॥

१ आणण्यास. २ कडे गेल्यें. ३ गांठून. ४ बलानें शोभणाऱ्या. ५ करिता झाला. ६ अर्ध्या निमिषांत ( पळांत ).

रामानें मनांत आणिलें, तर तो अर्ध्या क्षणांत सगळ्या त्रैलोक्याचें ॥ ९३ ॥ भस्म करून टाकील, ह्यांत संशय नाहीं, असें मला वाटतें. हे समर्था, जर ती स्त्री तुझी भार्या झाली तरच तुझें जीवित सफल होईल. ॥ ९४ ॥ ह्मणून, हे राजाधिराजा, सीता तुझी प्रियपत्नी होईल असें साधण्याचा यत्न कर. तिचे ते कमळाच्या पानासारखे नेत्र - पाहिल्यापासून माझ्या मनाचा तर निश्चयच झाला आहे कीं, - हिच्या सारखी दुसरी सुंदर स्त्री त्रिभुवनांत मिळावयाची नाहीं. ॥ ९५ ॥ रावणा, तुझी शक्ति कितीही मोठी असली तरी तुझ्यानें प्रत्यक्ष रामाच्या पुढें टिकाव धरवणार नाहीं. आतां, कांहीं कपटानें त्या रघुवीराला मोह घातलास तर मात्र सीता तुला प्राप्त होईल.' ॥ ९६ ॥ रावणानें तो वृत्तांत ऐकून घेतला, गोड गोड भाषणांनीं

भस्मीकुर्यान्न सन्देह इति भाति मम प्रभो ॥ यदि सा तव भार्या स्यात्सफलं तव जीवितम् ॥ ५४ ॥ अतो यतस्व राजेन्द्र यथा ते वल्लभा भवेत् ॥ सीता राजीवपत्राक्षी सर्वलोकैकसुन्दरी ॥ ५५ ॥ साक्षाद्रामस्य पुरतः स्थातुं त्वं न क्षमः प्रभो ॥ मायया मोहयित्वा तु प्राप्स्यसे तां रघूत्तमम् ॥ ५६ ॥ श्रुत्वा तत्सूक्तवाक्यैश्च दानमानादिभिस्तथा ॥ आश्वास्य भगिनीं राजा प्रविवेश स्वकं गृहम् ॥

(पू.) मम भाति. ॥ प्रभो, ( मू. ) सफलम्. ॥ ९४ ॥ राजेन्द्र ( मू. ) सीता ते वल्लभा यथा भवेत्, [ तथा ] यतस्व. ॥ ९५ ॥ प्रभो, त्वं (पू.); ॥ रघूत्तमं ( मू. ) प्राप्स्यसे. ' ॥ ९६ ॥ राजा तत् श्रुत्वा (पू.) ॥ भगिनीं ( द्वि. अ. ) प्रविवेश, ॥

१ यत्न कर. २ गोड भाषणांनीं. ३ सांत्वन करून.

व देणग्या, आदर सत्कार इत्यादिकांच्या योगानें बहिणीचें सांत्वन केलें, आणि आपल्या मंदिरांत प्रवेश केला. परंतु अंतःकरण चिंताग्रस्त झाल्यामुळें त्याला साऱ्या रात्रींत झोंप लागली नाहीं! ॥ ५७ ॥ त्याच्या मनांत घोळत होतें कीं :– ' राम ह्मणजे यःकश्चित् मनुष्य तो काय; आणि त्यानें एकट्यानें माझ्या खराचा व त्याचा सैन्याचा वध केला काय ! हें घडलें तरी कसें ! त्या माझ्या भावाला ( खराला ) स्वतांच्या शक्तीचा व धैर्याचा मोठा गर्व होता. त्याला रामानें मारिलें! ॥ ५८ ॥ अथवा, राम हा मनुष्य नसून परमेश्वरच असेल. माझ्याजवळ सैन्यसमुदाय पुष्कळ झाला आहे व मी फार प्रबल झालों आहें, ह्मणून माझा वध करण्याच्या इच्छेनें पूर्वी ब्रह्मदेवानें केलेल्या प्रार्थनेप्रमाणें प्रभु सध्यां रघूच्या कुलांत मनुष्यरूपानें



तत्र चिन्तापरो भूत्वा निद्रां रात्रौ न लब्धवान् ॥ ५७ ॥ एकेन रामेण कथं मनुष्यमात्रेण नष्टः सबलः खरो मे ॥ भ्राता कथं मे बलवीर्यदर्पयुतो विनष्टो बत राघवेण ॥ ५८ ॥ यद्वा न रामो मनुजः परेशो मां हन्तुकामः सबलं बलौघैः ॥ संप्रार्थितोऽयं द्रुहिणेन पूर्वं मनुष्यरूपोऽद्य रघोः कुलेऽभूत् ॥ ५९ ॥

(मू.)! ॥ ५७ ॥ ' मनुष्यमात्रेण ( पू. ) मे खरः कथं नष्टः ! ॥ राघवेण बलवीर्यदर्पयुतः[1] मे ( मू. )! ॥ ५८ ॥ यद्वा रामः मनुजः न; पूर्वं द्रुहिणेन[2] संप्रार्थितः अयं परेशः बलौघैः[3] सबलं (पू.). ॥ [ सन् ] ( मू. ) मनुष्यरूपः अभूत्. ॥ ५९ ॥

१ शक्ति व उत्साह ह्यांच्या गर्वानें युक्त. २ ब्रह्मदेवानें. ३ सैन्यसमुदायांनीं.

अवतरला असावा. ॥ ५९ ॥ जर परमेश्वराच्या हातून माझा वध झाला तर मी वैकुंठींच्या राज्याचें पालन करीन, नाहीं तर चिरकालपर्यंत ह्या राक्षसांच्या राज्याचाच उपभोग घेईन; - दोन्ही प्रकारें आपलें कल्याणच होणार आहे. - तेव्हां आपण रामाकडे जावेंच.' ॥ ६० ॥ त्या सर्व राक्षसांच्या राजानें असा विचार केला. राम साक्षात् परमेश्वर विष्णु होय, हें त्याला कळलें होतें. - परंतु त्याच्या मनाचा असा ग्रह झाला होता कीं, - विरोधबुद्धीनेंच रामपदाची प्राप्ति करून घ्यावी, हें चांगलें; कारण, सरळ भक्तिमार्गानें भगवान् लवकर प्रसन्न होत नाहीं. ॥ ६१ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणार्थबोधे अरण्यकाण्डे पंचमः सर्गः ॥५॥

रावणाची बुद्धि विशाल होती. त्यानें रात्रभर असा विचार करून, आपल्याला कर्तव्य काय, त्याचा

वध्यो यदि स्यां परमात्मना ऽहं वैकुण्ठराज्यं परिपालये ऽहम् ॥ नो चेदिदं राक्षसराज्यमेव भोक्ष्ये चिरं राममतो व्रजामि ॥६०॥ इत्थं विचिन्त्याखिलराक्षसेन्द्रो रामं विदित्वा परमेश्वरं हरिम् ॥ विरोधबुद्ध्यैव हरिं प्रयामि द्रुतं न भक्त्या भगवान्प्रसीदेत् ॥ ६१ ॥ इति अरण्यकाण्डे पञ्चमः सर्गः ॥ ५ ॥ विचिन्त्यैवं निशायां स प्रभाते रथमास्थितः ॥ रावणो मनसा कार्यमेकं निश्चित्य बुद्धिमान् ॥ १ ॥

अहं परमात्मना वध्यः यदि स्यां, [ तर्हि ] अहं ( पू. ); ॥ ( मू. ) चिरं भोक्ष्ये; अतः रामं व्रजामि.' ॥ ६० ॥ अखिलराक्षसेन्द्रः ( पू. ) विदित्वा ॥ ' ( मू. ) द्रुतं न प्रसीदेत् ' [ इति चिन्तयामास ]. ॥ ६१ ॥ इति पंचमः सर्गः ॥ ५ ॥ एवं निशायां ( पू. ) सः ॥ बुद्धिमान् ( उ. ) कार्यं निश्चित्य ॥१॥

१ जातों. २ सर्व राक्षसांचा राजा. ३ विरोध ( द्वेष ) बुद्धीनें. ४ जातों. ५ लवकर. ६ प्रसन्न होईल. ७ विचार करिता झाला.

एक निश्चय ठरविला. आणि उजाडतांच रथांत बसून ॥ १ ॥ तो समुद्राच्या पैल तीरीं मारीचाच्या घरीं गेला. मारीच राक्षस ऋषीप्रमाणें जटा व वल्कलें धारण करीत असे. ॥ २ ॥ ह्या वेळीं तो आपल्या हृद-यांत, वास्तविक गुणरहित असून त्रिगुणात्मक प्रकृतीच्या कार्यांना प्रकाशित करणाऱ्या परमात्म्याचें ध्यान करीत होता. त्यानें समाधि उतरली तेव्हां, रावण आपल्या घरीं आला आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. ॥ ३ ॥ लागलेंच उठून त्यानें रावणाला आलिंगन दिलें व त्याची यथाविधि पूजा केली. आदरोपचार झाल्या-वर रावण सुखासनीं स्वस्थ बसला असतां मारीचानें त्याला विचारिलें :– ॥ ४ ॥ ' रावणा, तूं - कोठेंही गेलास तरी बरोबर दाहापांच रथ, कांहीं तरी सेवक वगैरे असावयाचे; आणि आज तर - येथें एकाच रथा-

ययौ मारीचसदनं परं पारमुदन्वतः ॥ मारीचस्तत्र मुनिवज्जटावल्कलधारकः ॥ २ ॥ ध्यायन् हृदि परात्मानं निर्गुणं गुणभासकम् ॥ समाधिविरमे ऽपश्यद्रा-वणं गृहमागतम् ॥ ३ ॥ द्रुतमुत्थाय चालिंग्य पूजयित्वा यथाविधि ॥ कृतातिथ्यं सुखासीनं मारीचो वाक्यमब्रवीत् ॥ ४ ॥ समागमनमेतत्ते रथेनैकेन रावण ॥ चिन्तापर इवाभासि हृदि कार्यं विचिन्तयन् ॥ ५ ॥

उदन्वतः परं पारं मारीचसदनं ययौ. ( मू. ) मारीचः [ आसीत् ]. ॥ २ ॥ ( पू. ) परात्मानं ध्यायन् [ मारीचः ] ॥ ( मू. ) रावणं अपश्यत्. ॥ ३ ॥ मारीचः ( पू. ) पूजयित्वा ॥ ( मू. ) – ॥४॥ 'रावण, एतत् एकेन रथेन ते समागमनं ! ॥ ( मू. ) इव आभासि ! ॥ ५ ॥



१ समुद्राच्या. २ मारीचाच्या घरास. ३ गुणांस भासविणाऱ्या. ४ समाधि उतरल्यावर.

निशीं (सडा) आला आहेस ! तुझ्या मनांत कांहीं तरी कार्याबद्दल विचार घोळत आहेत; ह्मणून तूं मला अ-
गदी चिंताग्रस्त झाल्यासारखा दिसतोस ! ॥५॥ ह्यांत कांहीं गुप्त प्रकार नसेल तर मला सर्व वृत्तांत सांग; ह्मणजे
मी तुझ्या मनांत असेल तें कार्य करीन. राजाधिराजा, मात्र तें कृत्य न्यायमार्गाला किंवा धर्माला विरुद्ध
नसावें. एकंदरींत, त्याच्या आचरणानें मला पाप न लागलें, - ह्मणजे झालें. - ' ॥ ६ ॥ रावण ह्मणालाः—
' मारीचा, दशरथ ह्या नांवाचा एक अयोध्येचा अधिपति प्रसिद्ध राजा होऊन गेला. त्याचा वडील मुलगा
राम खरा पराक्रमी आहे. ॥ ७ ॥ दशरथानें त्या आपल्या मुलाला, बायको आणि भाऊ लक्ष्मण ह्यांना
बरोबर देऊन, वनांत घालवून दिलें. अरण्य ह्मटलें ह्मणजे रानटी प्राण्यांनाच प्रिय - खरें; पण सध्यां निरु-
पायास्तव त्यांना प्रिय मानावें लागत आहे. - ॥ ८ ॥ तो राम सांप्रत घोर अरण्यामध्यें पंचवटी नांवाच्या

ब्रूहि मे न हि गोप्यं चेत्करवाणि तव प्रियम्॥न्याय्यं चेद्ब्रूहि राजेन्द्र वृजिनं मां स्पृशे-
न्न हि ॥ ६ ॥ रावण उवाच। अस्ति राजा दशरथः साकेताधिपतिः किल ॥ रामनामा
सुतस्तस्य ज्येष्ठः सत्यपराक्रमः ॥ ७ ॥ विवासयामास सुतं वनं वनजनप्रियम् ॥ भार्यया
सहितं भ्रात्रा लक्ष्मणेन समन्वितम् ॥ ८ ॥ स आस्ते विपिने घोरे पञ्चवट्याश्रमे शुभे ॥

गोप्यं[1] न चेत् मे (पू.) करवाणि[2]. ॥ ( उ. ) स्पृशेत्[3]. ' ॥ ६ ॥ रा० उ० – ' (पू.) अस्ति किल. ॥
तस्य (मू.) सुतः [ अस्ति ]. ॥ ७ ॥ सः (मू.) सुतं वनजनप्रियं[5] वनं विवासयामास[6]. ॥ ८ ॥ सः
घोरे विपिने[7] शुभे पंचवट्याश्रमे आस्ते ॥

१ गुप्त. २ करतों. ३ पाप. ४ लागेल. ५ वनांतील लोकांस प्रिय, अशा. ६ घालविता झाला. ७ अरण्यांत.

'युक्तीनें सीता आणायाची.'

रमणीय आश्रमांत राहत असतो. त्याची बायको - फार सुंदर आहे. - तिचे नेत्र विशाल आहेत. - तिला पाहिल्याबरोबर - लोकांना मोह उत्पन्न होतो. ॥ ९ ॥ रामानें माझ्या महापराक्रमी राक्षसांना, त्यांच्याकडून कांहीं अपराध घडला नसतां ( विनाकारण ), मारिलें! खराचा वध करून, तो त्या अरण्यांत निर्भयपणें सुखानें राहिला आहे! ॥ १० ॥ त्याचें अंतःकरण फारच निर्दय असलें पाहिजे. माझी बहीण शूर्पणखा ह्मणजे किती गरीब; तिच्याकडून त्याची कांहीं देखील आगळीक घडली नाहीं; तथापि त्यानें तिचें नाक व कान कापून टाकिले! ॥ ११ ॥ ह्मणून मी तुला साह्यासाठीं बरोबर घेऊन तेथें जाणार, आणि राम अरण्यांत ( जवळपास ) नसला ह्मणजे त्याच्या प्राणवल्लभेला ( सीतेला ) घेऊन येणार. ॥ १२ ॥ तूं मायेनें हरिणाचे रूप घे आणि लक्ष्मणासह रामचंद्राला दूर काढून ने; इत-

तस्य भार्या विशालाक्षी सीता लोकविमोहिनी ॥ ९ ॥ रामो निरपराधान्मे राक्षसान् भीमविक्रमान् ॥ खरं च हत्वा विपिने सुखमास्ते ऽतिनिर्भयः ॥ १० ॥ भगिन्या मे शूर्पणख्या निर्दोषायाश्च नासिकाम् ॥ कर्णौ चिच्छेद दुष्टात्मा वने तिष्ठति निर्भयः ॥ ११ ॥ अतस्त्वया सहायेन गत्वा तत्प्राणवल्लभाम् ॥ आनयिष्यामि विपिने रहिते राघवेण ताम् ॥ १२ ॥ त्वं तु मायामृगो भूत्वा ह्याश्रमादपनेष्यसि॥

(उ.) सीता [अस्ति]. ॥ ९ ॥ (पू.) राक्षसान, ॥ (मू.) आस्ते. ॥ १० ॥ [सः] निर्दोषायाः मे (मू.) तिष्ठति. ॥ ११ ॥ (पू.)॥तां विपिने राघवेण रहिते[सति]आनयिष्यामि.॥ १२ ॥(मू.)[यदा]अपनेष्यसि, ॥

१ दूर नेशील.

क्यांत इकडे मी सीतेला उचलून आणितों. ॥ १३ ॥ तूं मला इतकें साह्य कर आणि पूर्वीप्रमाणें आपल्या आश्रमांत येऊन राहा.' रावणानें अशा प्रकारें भाषण केलें. तें पाहून ( ऐकून ) मारीचाला आश्चर्य वाटलें. - तो ह्मणालाः - ॥ १४ ॥ "रावणा, तुझ्या सर्वस्वी घाताला कारण असा हा उपदेश तुला केला कोणी ? - असा भलताच उपदेश करून - जो तुझा नाश झालेला पाहण्यासाठीं टपून बसला असेल, तो तुझा शत्रु होय; त्याचा प्रथम वध केला पाहिजे. ॥ १५ ॥ रावणा, रामाच्या पराक्रमाचें स्मरण झालें ह्मणजे अंतःकरण अगदीं घाबरून जातें ! लहानपणींच तो विश्वामित्राच्या यज्ञाचें संरक्षण करायाला आला होता; त्यावेळीं त्यानें एकच बाण मारून मला शंभर योजनें समुद्रांत फेंकून दिलें ! तेव्हांपासून मी अगदीं भयानें गांगरून गेलों आहे.

रामं च लक्ष्मणं चैव तदा सीतां हराम्यहम् ॥१३॥ त्वं तु तावत्सहायं मे कृत्वा स्थास्यसि पूर्ववत् ॥ इत्येवं भाषमाणं तं रावणं वीक्ष्य विस्मितः ॥ १४ ॥ केनेदमुपदिष्टं ते मूलघातकरं[2] वचः ॥ स एव शत्रुर्वध्यश्च यस्त्वन्नाशं प्रतीक्षते[3] ॥१५॥ रामस्य पौरुषं[4] स्मृत्वा चित्तमद्यापि रावण॥बालो ऽपि मां कौशिकस्य यज्ञसंरक्षणाय सः ॥१६॥ आगतस्त्विषुणैकेन[6] पातयामास सागरे॥ योजनानां शतं रामस्तदादि भयविह्वलः[5]॥१७॥

तदा अहं सीतां हरामि. ॥ १३ ॥ त्वं तु मे ( पू. ) स्थास्यसि[1]. ' ॥ [ मारीचः ] ( मू. ) [ सन् उवाच ] - ॥१४॥ "(पू.) ते उपदिष्टं ? ॥ (मू.) ॥१५॥ रावण, (पू.) [विकलं] ! ॥ (१६ उ.) आगतः बालः अपि सः रामः मां एकेन इषुणा योजनानां शतं सागरे पातयामास; (बा.१७मू.) ॥१६॥१७॥

१ राहशील. २ मूळाचा घात करणारें. ३ टपून वाट पहात बसतो. ४ पराक्रमास. ५ विव्हळ झालें. ६ बाणानें.

॥ १६ ॥ १७ ॥ त्या गोष्टींचें वरचेवर स्मरण होऊन मला जिकडे तिकडे रामच भरलेला आहे, असा भास होतो! ॥ १८ ॥ पूर्वींचें शत्रुत्व मनांत घोळत असल्यामुळें मीं एकदां तीक्ष्ण शिंगांच्या हरिणाचें रूप घेतलें व माझ्यासारखेच ( प्रतापी ) पुष्कळ राक्षस बरोबर घेऊन दंडकारण्यांतही पुन्हां त्याच्या आंगावर गेलों. ॥ १९ ॥ सीता आणि लक्ष्मण ह्यांसह रामचंद्र जेथें होता, त्या ठिकाणीं जाऊन पोंचल्यावर मी मोठ्या त्वरेनें त्यांना मारण्यास उद्युक्त झालों. रामानें मला पाहतांच एक बाण फेंकला; ॥ २० ॥ हे राक्षसाधिपते, तो बाण माझ्या वक्षस्थळाला लागला व मी गोलांच्या खात खात ह्या समुद्रांत येऊन पडलों!

स्मृत्वा स्मृत्वा तदेवाहं रामं पश्यामि सर्वतः ॥ १८ ॥ दण्डके ऽपि पुनरप्यहं वने पूर्ववैरमनुचिन्तयन् हृदि ॥ तीक्ष्णशृंगमृगरूपमेकदा[1] मादृशैर्[2]बहुभिरावृतो[3] ऽभ्ययाम् ॥ १९ ॥ राघवं जनकजासमन्वितं लक्ष्मणेन सहितं त्वरान्वितः ॥ आगतो ऽहमथ हन्तुमुद्यतो मां विलोक्य शरमेकमाक्षिपत्[4] ॥ २० ॥ तेन विद्धहृदयो[5] ऽहमुद्भ्रमन्[6] राक्षसेन्द्र पतितो ऽस्मि सागरे ॥ तत्प्रभृत्यहमिदं समाश्रितः स्थानमूर्जितमिदं भयार्दितः ॥ २१ ॥

अहं तत एव ( मू. ) पश्यामि. ॥ १८ ॥ एकदा, हृदि पूर्ववैरं अनुचिन्तयन् अहं तीक्ष्णशृंगमृगरूपं [ धृत्वा ] पुनः अपि ( मू. ) [ सन् ] अभ्ययां. ॥ १९ ॥ त्वरान्वितः अहं (पू.) राघवं ॥ ( मू. ). ॥२०॥ राक्षसेन्द्र, ( पू.) [सन्] सागरे पतितः अस्मि. ॥ तत्प्रभृति[7] भयार्दितः[8] (मू.) ऊर्जितम्[9]. ॥२१॥

१ तीक्ष्ण शिंगाच्या हरिणाचें रूप. २ माझ्यासारख्या. ३ वेष्टिलेला. ४ फेंकिता झाला. ५ ताडिलें हृदय ज्याचें, असा. ६ गोलांच्या खाणारा. ७ तेव्हांपासून. ८ भयानें पीडित. ९ पीडारहित; शांत.

तेव्हांपासून पक्की धास्ती खाऊन मी ह्या स्थळीं राहत असतों हें स्थान अगदीं निर्भय आहे. ॥ २१ ॥ राजा, रत्न, रमणी ( सुंदर स्त्री ), रथ इत्यादि नुसते शब्द जरी कानीं पडले तरी - त्यांत 'र' हें अक्षर असल्यामुळें मला भास होतो कीं 'राम आला!' असेंच कोणी ह्मटलें! - आणि मी भयानें दचकतों! हा सर्व पदार्थांचा समुदाय उपभोग्य खरा ना? तरी पण - जेथें तेथें राम दिसल्यामुळें - मी एकसारखा म्याल्या-म्याल्यासारखा असतों! माझ्या मनांत एक सारखा राम घोळत असतो! ॥ २२ ॥ राम आला ( येईल ) कीं काय, अशा शंकेमुळें मी बाहेरचीं सर्व कामें सोडून दिलीं व सतत निजून असतों. तरी पण मनामध्यें त्याच्याविषयींचेच विचार चालतात; ह्मणून झोंप लागते न लागते इतक्यांत, ॥ २३ ॥ स्वप्नामध्यें रामाची

राममेव सततं विभावये भीतभीत इव भोगराशितः ॥ राजरत्नरमणीरथादिकं[1] श्रोत्रयो-र्यदि गतं[2] भयं भवेत् ॥ २२ ॥ राम आगत इहेति शंकया बाह्यकार्यमपि सर्वमत्यजम्[3] ॥ निद्रया परिवृतो यदा स्वपे राममेव मनसा ऽनुचिन्तयन् ॥ २३ ॥ स्वप्नदृष्टिग-तराघवं तदा बोधितो[6] विगतनिद्र आस्थितः ॥ तद्भवानपि विमुच्य चाग्रहं राघवं प्रति गृहं प्रयाहि भो ॥

भोगराशितः भीतभीतः इव [ अहं ] ( मू. ). ॥ २२ ॥ (मू.) यदा स्वपे, ॥ २३ ॥ तदा स्वप्नदृष्टि-गतराघवं पश्यन् (पू.)! ॥ भो रावण, तत् भवान् अपि राघवं प्रति आग्रहं विमुच्य गृहं प्रयाहि, ॥

---

१ राजा, रत्न, रमणी ( सुंदर बायको ), रथ इत्यादि - ज्यांत 'र' हें अक्षर प्रारंभीं आहे - असें. २ कानीं. ३ टाकिला झाला. ४ निजतों. ५ स्वप्नांत दृष्टीस पडलेल्या रामाला. ६ जागा झालेला. ७ गेली झोंप ज्याची, असा. ८ सोडून. ९ जा.

मूर्ति दृष्टीस पडते आणि लागलाच मी जागा होतों! मग झोंप कांहीं लागत नाहीं ! शेवटीं बसलें राहून वेळ काढावा लागतो ! ह्मणून - मी तुला सांगतों कीं, - बा, तूंही रामाविषयींचा दुराग्रह सोडून परत जा आणि फार दिवसांपासून चालत आलेल्या राक्षसांच्या ( राज्याचें ) कुलाचें पालन करीत राहा. रामाची गोष्ट मनांत आणलीस किंवा त्याच्या वाटेस गेलास, तर सगळें राक्षसांचें कुल नाश पावेल ! ॥ २४ ॥ मी तुझ्या हिताची ही गोष्ट सांगत आहें. माझा उपदेश ध्यानांत घे. रामचंद्र साक्षात् परमेश्वर होय. त्याची विरोध भक्ति करूं नकोस, सरळ भक्तिमार्गानें सेवा कर. तो रघुनंदन परम दयाळु आहे. ॥ २५ ॥ शिवाय, पूर्वी नारदमुनींच्या वचनावरून मला असा वृत्तांत पूर्णपणें कळला आहे कीं, सत्य युगांत ब्रह्मदेवानें परमेश्वराची प्रार्थना केली; तेव्हां तो भक्तसंकटहर्ता प्रभु - प्रसन्न होऊन ब्रह्मदेवाला - ह्मणाला, 'तुझी इच्छा काय आहे, - ती मला सांग; - त्याप्रमाणें मी व्यवस्था करितों '; ॥ २६ ॥

रक्ष राक्षसकुलं चिरागतं तत्स्मृतौ सकलमेव नश्यति॥ २४ ॥ तव हितं वदतो मम भाषितं परिगृहाण परात्मनि राघवे॥ त्यज विरोधमतिं भज भक्तितः परमकारुणिको रघुनन्दनः ॥२५॥ अहमशेषमिदं मुनिवाक्यतो ऽशृर्णवमादियुगे परमेश्वरः॥ ब्रह्मणा ऽर्थित उवाच तं हरिः किं तवेप्सितमहं करवाणि तत्॥२६॥

चिरागतं राक्षसकुलं (मू.)! ॥ २४ ॥ ( पू. ) ॥ विरोधमतिं त्यज; भक्तितः ( मू. ). ॥ २५ ॥ ( मू. ) तं उवाच – ' तव ईप्सितं किं ? अहं तत् करवाणि. ' ॥ २६ ॥

१ फार दिवस चालत आलेल्या. २ स्वीकार कर ( मनांत घे ). ३ अत्यंत दयाळु. ४ **अशृणवम्** ऐकिता झाला. ५ करितों.

ह्यावर ब्रह्मदेव ह्मणाला, ‘ हे कमलनयना ईश्वरा, आपण मनुष्याचें रूप घेऊन दशरथाचा पुत्र होऊन भूमीवर जावें आणि, आमचा शत्रु जो दशमुखी रावण, त्याचा लवकर वध करावा.’ ॥ २७ ॥ ह्यावरून - असें सिद्ध होतें कीं, - राम हा मनुष्य नव्हे, तर साक्षात् निर्विकार नारायण मायेनें मनुष्याचा वेष घेऊन भूमीचा भार दूर करण्यासाठीं वनांत आला आहे; त्याला कोणाचें किंचित्देखील भय नाहीं. ह्मणून, बाबा, सुखानें आपला घरीं जा कसा. ” हें मारीचाचें भाषण ऐकिल्यावर रावणानें त्याला प्रत्युत्तर दिलें :– ॥ २८ ॥ २९ ॥ ‘मारीचा, राम परमेश्वर हें जर सिद्ध आहे, व तो जर ब्रह्मदेवाच्या प्रार्थनेवरून मला मारण्यासाठीं मनुष्य हो-

ब्रह्मणोक्तमरविन्दलोचन त्वं प्रयाहि भुवि मानुषं वपुः ॥ दशरथात्मजभावम[१]ञ्जसा जहि रिपुं दश[२]कन्धरं हरे ॥२७॥ अतो न मानुषो रामः साक्षान्नारायणोऽव्ययः ॥ मायामानुषवेषेण वनं यातोऽतिनिर्भयः ॥२८॥ भूभारहरणार्थाय गच्छ तात गृहं सुखम् ॥ श्रुत्वा मारीचवचनं रावणः प्रत्यभा[३]षत ॥ २९ ॥ परमात्मा यदा रामः प्रार्थितो ब्रह्मणा किल ॥ मां ह[४]न्तुं मानुषो भूत्वा यत्नादिह समागतः ॥ ३० ॥

ब्रह्मणा उक्तं – ‘ हरे, (पू.) [ धृत्वा ] प्रयाहि, ॥ दशरथात्मजभावं [ प्राप्य ] ( मू. ) जहि. ’ ॥ २७ ॥ अतः रामः मानुषः ( बा. २८ मू. ) भूभारहरणार्थाय मायामानुषवेषेण वनं यातः. ( बा. २९ पू. ) गच्छ. ” ॥ मारीचवचनं ( मू. ) – ॥ २८ ॥ २९ ॥ ‘ ( पू. ) ब्रह्मणा यदा प्रार्थितः [ तदा ] मानुषो भूत्वा ( मू. ). ॥ ३० ॥

---

१ लवकर. २ दशमुखी रावणाला. ३ प्रत्युत्तर सांगूं लागला. ४ मारण्यासाठीं.

‘ बऱ्या बोलानें माझें ऐक.’

ऊन प्रयत्नानें येथें आला आहे, तर ॥ ३० ॥ तो सत्यसंकल्प प्रभु आपलें कार्य लवकरच सिद्ध करील; - त्याबद्दल काळजी करून काय होणार ? - ह्मणून, मी होतील तितके प्रयत्न करून रामापासून सीता आणणारच. ॥ ३१ ॥ हे वीरा, रणांत मरण पावलों तर मी परम पदास प्राप्त होईन; नाहीं तर युद्धांत रामाला मारून निर्भयपणें सीतेचा लाभ करून घेईन. ॥ ३२ ॥ ह्मणून, - माझें तुला एवढेंच सांगणें आहे कीं, - हे भाग्यशाली पुरुषा, ऊठ; विचित्र प्रकारच्या हरणाचें रूप घे; लक्ष्मणासह रामचंद्राला आश्रमांतून लवकर पुष्कळसा लांब ॥ ३३ ॥ काढून ने, आणि नंतर लागलाच घरीं येऊन पूर्वीप्रमाणें स्वस्थ राहा. ह्याच्यापुढें

करिष्यत्यचिरादेव सत्यसंकल्प ईश्वरः॥ अतो ऽहं यत्नतः सीतामानेष्याम्येव राघवात् ॥ ३१ ॥ वधे प्राप्ते रणे वीर प्राप्स्यामि परमं पदम् ॥ यद्वा रामं रणे हत्वा सीतां प्राप्स्यामि निर्भयः ॥ ३२॥ अतोत्तिष्ठ[3][4] महाभाग विचित्रमृगरूपधृक्[5] ॥ रामं सलक्ष्मणं शीघ्रमाश्रमादतिदूरतः ॥ ३३ ॥ आक्रम्य गच्छ त्वं शीघ्रं सुखं तिष्ठ यथा पुरा ॥ अतः परं चेद्यत्किंचिद्भाषसे मद्विभीषणम्[6] ॥ ३४ ॥

(पू.) अचिरात् एव करिष्यति. ॥ ( उ. ) आनेष्यामि[1] एव. ॥ ३१ ॥ वीर, रणे ( पू. ) प्राप्स्यामि[2]. ॥ यद्वा निर्भयः अहं ( मू. ) प्राप्स्यामि[2]. ॥ ३२ ॥ महाभाग, ( पू. ) ॥ त्वं शीघ्रं सलक्ष्मणं ( ३३ उ. ३४ पू. ) सुखं तिष्ठ. ॥ ( ३४ उ. ) भाषसे[7] चेत्, ॥ ३३ ॥ ३४ ॥

१ आणीन. २ पावेन. ३ अतः ह्मणून. ४ उत्तिष्ठ ऊठ. ५ चमत्कारिक हरणाचें रूप घेणारा. ६ मला भिवविणारें. ७ बोलशील.

॥ ३९ ॥

जर कां कांहीं मला भीति वाटण्यासारखें भाषण केलेंस, ॥ ३४ ॥ तर ह्या खड्गानें येथेंच तुझा वध करी-न, ह्यांत अंतर होणार नाहीं, हें पक्कें समज !' मारीचानें तें भाषण ऐकून घेतलें व आपल्या मनाशींच वि-चार केला :– ॥ ३५ ॥ 'रामानें माझा वध केला, तर मी संसारसमुद्रांतून मुक्त होईन; आणि जर कां ह्या दुष्टाच्या हातून मरण आलें, तर मला निश्चयानें नरकांत पडावें लागेल !' ॥ ३६ ॥ अशा विचाराअंतीं, रामाच्याच हातून मरावें, असें ठरवून मारीच खडबडून उठला आणि रावणाला ह्मणाला :– 'राजा, तूं महा-समर्थ आहेस; तेव्हां तुझी आज्ञा मला मानलीच पाहिजे.' ॥ ३७ ॥ असें बोलून - मारीच त्याच्याबरोबर जाण्यास सिद्ध झाला. - नंतर ते दोघे रथांत बसून रामाच्या आश्रमीं आले. मारीचानें शुद्ध सुवर्णासार-

हनिष्याम्यसिना ऽनेन त्वामत्रैव न संशयः ॥ मारीचस्तद्वचः श्रुत्वा स्वात्मन्येवा-न्वचिंन्तयत् ॥ ३५ ॥ यदि मां राघवो हन्यात्तदा मुक्तो भवार्णवात् ॥ मां हन्या-द्यदि चेद्दुष्टस्तदा मे निरयो ध्रुवम् ॥ ३६ ॥ इति निश्चित्य मरणं रामादुत्थाय वे-गतः ॥ अब्रवीद्रावणं राजन्करोम्याज्ञां तव प्रभो ॥ ३७ ॥ इत्युक्त्वा रथमास्थाय गतौ रामाश्रमं प्रति ॥ शुद्धजाम्बूनदप्रख्यो मृगो ऽभूद्रौप्यबिन्दुकः ॥ ३८ ॥

[तर्हि] अनेन (पू.) हनिष्यामि; न संशयः.' ॥ (मू.) – ॥ ३५ ॥ '(पू.) मुक्तः. ॥ दुष्टः (मू.).' ॥३६॥ इति रामात् मरणं निश्चित्य वेगतः उत्थाय रावणं अब्रवीत् – 'राजन्, प्रभो, तव आज्ञां करोमि.' ॥ ३७ ॥ इति उक्त्वा [ मारीचरावणौ ] (पू.) गतौ. [ मारीचः ] ( मू. ) मृगः अभूत्. ॥ ३८ ॥

१ विचार करिता झाला. २ मारील. ३ नरक. ४ स्वच्छ सोन्याचा. ५ रुप्याचे ठिपके ज्यावर, असा.

ख्या किंबहुना सुवर्णाच्याच हरणाचें रूप घेतलें; त्याच्या आंगावर रुप्यासारखे ठिपके होते; ॥ ३८ ॥ त्या हरिणाचीं शिंगें रत्नाचीं होतीं; खुर हिऱ्याचे, डोळे इंद्रनील मण्यासारखे, कांति विजेसारखी, आणि मुख सुंदर होतें. तो हरिण वनांत इकडे तिकडे बागडूं लागला. ॥ ३९ ॥ तो रामाच्या आश्रमाजवळ सीतेची दृष्टि पोंचेल अशा ठिकाणीं उड्या मारी, ॥ ४० ॥ कांहीं वेळ धांवे, पुन्हां कांहीं वेळ स्थिर उभा राही, जवळ येई, पुन्हां भयभीत होऊन पळे. कपटानें हरणाचें रूप धारण करणारा तो दुष्ट राक्षस सीतेला मोह घालण्यासाठीं अशा रीतीनें फिरत राहिला. ॥ ४१ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणार्थबोधे अरण्यकाण्डे षष्ठः सर्गः ॥ ६ ॥

रत्न[1]शृंगो मणिखु[2]रो नीलर[3]त्नविलोचनः ॥ विद्युत्प्र[4]भो विमुग्धास्[5]यो विचचार वनान्तरे ॥ ३९ ॥ रामाश्रमपदस्यान्ते सीतादृष्टिपथे चरन् ॥ ४० ॥ क्षणं च धा[8]वत्यवतिष्ठ[9]ते क्षणं समीपमागत्य पुनर्भयावृतः ॥एवं स मायामृ[10]गवेषरूपधृक्चचार सीतां परिमोहयन्खलः ॥ ४१ ॥ इति श्रीमद० रामा० उ० अरण्यका० षष्ठः सर्गः ॥६॥

( मू. ) [ सः मृगः ] [6]वनान्तरे विचचार. ॥ ३९ ॥ (मू.) ॥ ४० ॥ सः [7]खलः (मू.) चचार[11]. ॥४१॥

॥ इति श्रीमदध्यात्मरामायणान्वये अरण्यकाण्डे षष्ठः सर्गः ॥ ६ ॥

१ रत्नांचीं शिंगें ज्याचीं, असा. २ हिऱ्याचे खुर ज्याचे, असा. ३ निळ्या रत्नाचे डोळे ज्याचे, असा. ४ विजेसारखी कांति ज्याची, असा. ५ सुंदर मुख ज्याचें, असा. ६ रानामध्यें. ७ दुष्ट. ८ धांवे. ९ उभा राही. १० कपटानें हरणाचें रूप घेणारा. ११ फिरत राहिला.

इकडे, रामचंद्राला रावणाचे सर्व उद्देश व व्यापार कळून आले. ह्मणून त्यानें एकांतीं सीतेला सांगितलें :–' जानकि, माझें भाषण श्रवण कर. ॥ १ ॥ रावण संन्याशाचें रूप घेऊन तुझ्या समीप येणार आहे. म्हणून तूं तुझ्याच आकाराची एक छाया आश्रमामध्यें ठेवून स्वतां अग्नीमध्यें प्रवेश कर व माझ्या आज्ञेवरून तेथें ( अग्नींत ) गुप्त रूपानें एक वर्षपर्यंत राहा. सुंदरि, - भिऊं नकोस. - रावणाचा वध झाल्यावर तूं पूर्वीप्रमाणें मजजवळ प्राप्त होशील. ॥ २ ॥ ३ ॥ हें रामाचें भाषण श्रवण केल्यावर सीतेनें लागलेंच तसें केलें–मायेची सीता - निर्माण करून - बाहेर ठेवून दिली आणि स्वतां अग्नींत प्रवेश केला.॥४॥

अथ रामोऽपि तत्सर्वं ज्ञात्वा रावणचेष्टितम् ॥ उवाच सीतामेकान्ते शृणु जानकि मे वचः ॥ १ ॥ रावणो भिक्षुरूपेण आगमिष्यति तेऽन्तिकम् ॥ त्वं तु छायां त्वदाकारां स्थापयित्वोटजे विश ॥ २ ॥ अग्नावदृश्यरूपेण वर्षं तिष्ठ ममाज्ञया ॥ रावणस्य वधान्ते मां पूर्ववत्प्राप्स्यसे शुभे ॥ ३ ॥ श्रुत्वा रामोदितं वाक्यं साऽपि तत्र तथाऽकरोत् ॥ मायासीतां बहिःस्थाप्य स्वयमन्तर्दधेऽनले॥ ४॥

(पू.) ज्ञात्वा ॥ एकांते सीतां उवाच – ' ( मू. ) शृणु. ॥ १ ॥ शुभे, ( पू. ) आगमिष्यति. ॥ त्वं तु मम आज्ञया त्वदाकारां छायां उटजे स्थापयित्वा अग्नौ विश. ( बा. ३ मू. ). ॥ २ ॥ ३ ॥ सा अपि रामोदितं वाक्यं ( मू. ) अंन्तर्दधे. ॥ ४ ॥

---

१ सन्याशाच्या रूपानें. २ जवळ. ३ येईल. ४ तुझ्या आकाराची. ५ आश्रमांत. ६ ठेवून. ७ शीर. ८ बहिःस्थाप्य बाहेर ठेवून. ९ अग्नींत. १० गुप्त झाली.

'मला हा हरिण पाहिजे.'

मारीचानें कपटेंकरून धरिलेलें तें हरिणरूप ह्या मायिक सीतेच्या दृष्टीस पडलें. तेव्हां ती हांसत हांसत रामाजवळ येऊन नम्रतापूर्वक ह्मणाली :– ॥ ५ ॥ 'रामचंद्रा ! पहा पहा ! तो सुवर्णाचा मृग इकडे तिकडे निर्भयपणें फिरत आहे. असा हरिण आजपर्यंत कोणी पाहिलाही नसेल ! त्याचें शरीर रत्नांनीं सुशोभित केल्यासारखें दिसतें; कारण त्याच्यावर चित्र विचित्र अनेक बिंदु आहेत. ॥ ६ ॥ रामा, तो सुंदर मृग बांधून आणून मला द्या. त्याच्याकडून माझी करमणूक होईल.' रामचंद्र 'बरें आहे ( देतों )' असें ह्मणून धनुष्य घेऊन निघाला व जातांना लक्ष्मणाला ह्मणाला :– ॥ ७ ॥ 'लक्ष्मणा, तूं मोठ्या दक्षतेनें, माझी प्राणवल्लभा जी सीता, तिचें रक्षण कर. ह्या अरण्यांत अक्राळविक्राळ

मायासीता तदाऽपश्यन्मृगं मायाविनिर्मितम् ॥ हसन्ती राममभ्येत्य प्रोवाच विनयान्विता ॥ ५ ॥ पश्य राम मृगं चित्रं कानकं रत्नभूषितम् ॥ विचित्रबिन्दुभिर्युक्तं चरन्तमकुतोभयम्[1] ॥ ६ ॥ बद्ध्वा देहि मम क्रीडामृगो भवतु सुंदरः ॥ तथेति धनुरादाय गच्छन् लक्ष्मणमब्रवीत् ॥ ७ ॥ रक्ष त्वमतियत्नेन सीतां मत्प्राणवल्लभाम् ॥ मायिनः[2] सन्ति विपिने राक्षसा घोरदर्शनाः[3] ॥ ८ ॥

(पू.) ॥ मृगं अपश्यत्, ॥ (मू.) [ सती ] प्रोवाच – ॥ ५ ॥ '(मू.) मृगं पश्य. ॥ ६ ॥ (पू.) क्रीडामृगः भवतु.' ॥ ( मू. ) – ॥ ७ ॥ '( पू. ) सीतां रक्ष; ॥ (मू.) राक्षसाः विपिने संति. ॥८॥ 

१ नाहीं कोठूनही भय ज्याला, असा. २ कपटी. ३ भयंकर दिसणारे.

स्वरूपें घेणारे मायावी राक्षस पुष्कळ आहेत ! ॥ ८ ॥ म्हणून, तूं येथें सावधपणें ह्या पुण्यकीर्ति साध्वीचें रक्षण करीत राहा.' ह्यावर लक्ष्मण रामाला ह्मणाला :– 'देवा ! हा हरणाचें रूप धारण करणारा मारीच राक्षस आहे. ह्याविषयीं अगदीं संशय नको. असा विलक्षण हरिण सृष्टींत असेल कोठून ? ' ॥ ९ ॥ राम ह्मणाला :– 'लक्ष्मणा, जर हा मारीचच असेल, तर मी ह्याचा वध करीन, ह्यांत संदेह नाहीं. बरें हरिण असेल तर, सीतेला विसांवा मिळावा किंवा कर्मणूक व्हावी एवढ्यासाठीं, घेऊन येईन. ॥ १० ॥ आतां मी जातों, व लवकरच हरणाला बांधून घेऊन येतों. तूं दक्षतेनें सीतेच्या संरक्षणासाठीं उद्युक्त राहा.'॥ ११॥ असें सांगून रामचंद्र त्या मायावी मृगाच्या मागें धांवत गेला ! - ( शंकर ह्मणतात :– पार्वति, ) रामाचें

अतोऽत्रावहितः साध्वीं रक्ष सीतामनिन्दिताम्[1] ॥ लक्ष्मणो राममाहेदं देवायं मृगरूपधृक् ॥ मारीचोऽत्र न संदेह एवंभूतो मृगः कुतः ॥ ९ ॥ श्रीराम उवाच । यदि मारीच एवायं तदा हन्मि[2] न संशयः ॥ मृगश्चेदानयिष्यामि सीतायाविश्रामहेतवे[3] ॥ १० ॥ गमिष्यामि मृगं बद्ध्वा ह्यानयिष्यामि सत्वरः ॥ त्वं प्रयत्नेन संतिष्ठ सीतासंरक्षणोद्यतः ॥ ११ ॥ इत्युक्त्वा प्रययौ रामो मायामृगमनुद्रुतः ॥

अतः त्वं अवहितः [ सन ] (पू.) सीतां रक्ष. ' ॥ लक्ष्मणः रामं इदं आह – ' (मू.) ? ' ॥ ९ ॥ श्रीराम उवाच – ' (मू.) आनयिष्यामि. ॥ १० ॥ अहं सत्वरः [ सन ] (मू.) संतिष्ठ. ' ॥ ११ ॥ ( पू. ) रामः प्रययौ. ॥

---

१ कोणी निंदा केली नाहीं जिची, अशी. २ मारतों. ३ सीतेला विसांव्यासाठीं.

सामर्थ्य ह्मणजे केवढें प्रचंड तें लक्षांत आण :- लोकांना मोह घालणारी व जगाच्या रूपानें परिणाम पावणारी माया त्याच्या आश्रयानें राहते; ॥ १२ ॥ तो निर्विकार असून केवल चैतन्यरूप आहे; त्याच्या सर्व कामना निरंतर पूर्ण आहेत, - कारण तो आनंदमय होय. - तथापि तो त्या हरिणाच्या पाठीमागें धांवत सुटला ! - ह्यावरून उघड होतें कीं - 'भगवान् भक्तांवर दया करणारा व त्यांचीं दुःखें दूर करणारा आहे,' हें वचन सत्य होय. ॥ १३ ॥ ह्मणूनच तो, - 'हा मृग खरा नसून राक्षस आहे' हें - जाणत असूनही, सीतेची कामना पूर्ण करण्यासाठीं मृगाच्या पाठीमागें धांवला. असें न म्हणावें तर वस्तुतः राम नित्य पूर्णकाम आहे; त्याला आत्मस्वरूप कळतें; ॥ १४ ॥ तेव्हां त्या परमेश्वराला हरणाशीं किंवा स्त्रीशीं करावयाचें होतें काय ? असो. तो हरिण कांहीं वेळ अगदीं जवळ दिसे, क्षणांत धांवत सुटे, अंमळशानें गुप्त होई,॥१५॥ कांहीं वेळानें पुष्कळ लांबसा दिसे. अशा रीतीनें त्यानें रामाला - (हुलकावण्या दाखवून) - बऱ्याच अंतरावर

माया यदाश्रया लोकमोहिनी जगदाकृतिः ॥ १२ ॥ निर्विकारश्चिदात्मा ऽपि पूर्णो[1] ऽपि मृगमन्वगात् ॥ भक्तानुकम्पी भगवानिति सत्यं वचो हरिः ॥ १३ ॥ कर्तुं सीताप्रियार्थाय जानन्नपि मृगं ययौ ॥ अन्यथा पूर्णकामस्य रामस्य विदितात्मनः[2] ॥ १४ ॥ मृगेण वा स्त्रिया वा ऽपि किं कार्यं परमात्मनः ॥ कदाचिद्दृश्यते ऽभ्याशे[3] क्षणं धावति[4] लीयते[5] ॥ १५ ॥ दृश्यते च ततो दूरादेवं राममपाहरत्[6] ॥

(मू.)माया यदाश्रया[वर्तते.]॥१२॥(पू.)॥हरिः(मू.)सत्यं.॥१३॥(मू).॥१४॥परमात्मनः(मू.)॥१५॥(पू.)॥

१ पुरल्या इच्छा ज्याच्या, अशा. २ जाणिला आत्मा ज्यानें, अशा. ३ समीपभागीं. ४ धांवतो. ५ गुप्त होतो. ६ दूर नेता झाला.

काढून नेलें. तेव्हां रामाच्याही स्पष्टपणें ध्यानांत आलें कीं, हा राक्षसच आहे. ॥ १६ ॥ पुढें त्यानें एक बाण घेऊन त्या हरिणरूपी राक्षसावर सोडिला. त्याबरोबर तत्काल मारीच आपलें पूर्वीचें (खरें) रूप घेऊन भूमीवर पडला. त्याचें तोंड रक्तानें भरून गेलें. ॥१७॥ पडतां पडतां त्या राक्षसानें रामासारखा स्वर काढून 'हाय हाय ! मेलोंरे मेलों ! हे महाबाहो लक्ष्मणा ! लवकर येऊन माझें संरक्षण कर ! ' असे उद्गार काढिले ! ॥ १८ ॥ अज्ञानी प्राण्यानेंदेखील मरणसमयीं ज्याचें नुसतें नामस्मरण केलें तर त्याला सायुज्यमुक्ति प्राप्त होते, त्या प्रभूच्या अग्रभागीं व त्याच्या स्वरूपाचें ध्यान करीत मारीचाला मरण आलें; शिवाय प्रत्यक्ष रामचंद्राच्या हातून त्याचा वध झाला. तेव्हां त्याला मुक्ति मिळाली ह्यांत नवल तें काय ? ॥ १९ ॥ त्याच्या देहांतून बाहेर पडलेलें तेज

ततो रामो ऽपि विज्ञाय राक्षसो ऽयमिति स्फुटम् ॥ १६ ॥ विव्याध शरमादाय राक्षसं मृगरूपिणम्॥ पपात रुधिराक्तास्यो मारीचः पूर्वरूपधृक् ॥१७॥ हा हतो ऽस्मि महाबाहो त्राहि लक्ष्मण मां द्रुतम् ॥ इत्युक्त्वा रामवद्वाचा पपात रुधिराशनः ॥ १८ ॥ यन्नामाज्ञो ऽपि मरणे स्मृत्वा तत्साम्यमाप्नुयात् ॥ किमुताग्रे हरिं पश्यंस्तेनैव निहतो ऽसुरः ॥ १९ ॥ तद्देहादुत्थितं तेजः सर्वलोकस्य पश्यतः ॥

( मू. ) विज्ञाय ॥ १६ ॥ ( पू. ) राक्षसं विव्याध. ॥ ( मू. ) [ सन् ] पपात. ॥ १७ ॥ रुधिराशनः ' महाबाहो लक्ष्मण, ( पू. ) त्राहि. ' ( मू. ) उक्त्वा पपात. ॥ १८ ॥ अज्ञः अपि मरणे ( मू. ) [ सायुज्यं प्राप्तः इति ] किमुत ? ॥ १९ ॥ ( पू. ) [ सतः ] ॥

१ घेऊन. २ प्रहार केला. ३ रक्तानें भरलें मुख ज्याचें, असा ४ मूळचें रूप घेणारा. ५ शीघ्र. ६ पावेल.

सर्व लोकांच्या समक्ष रामाच्याच स्वरूपीं येऊन मिळालें. ह्या वेळीं देवांना परम विस्मय वाटला. ॥२०॥ - ते ह्मणाले :- 'अहो ! हा मारीच ह्मटला ह्मणजे मुनींचा घात करणारा महापातकी! ह्यानें कर्मं केलीं काय आणि स्थान मिळविलें कोणतें ! (ह्याच्या कर्माप्रमाणें ह्याला नरकांत पचत पडणें भाग होतें, पण मुक्ति मिळाली हें आहे तरी काय?) अथवा, हा रामचंद्राचा महिमा आहे, ह्यांत संशय नाहीं. ॥२१॥ पूर्वीं ह्याला एकदां रामाच्या बाणाचा प्रहार लागला होता, तेव्हांपासून हा भीतीमुळें घर, द्रव्य जेंजें कांहीं होतें तें सर्व सोडून देऊन रामाचें ध्यान करीत राहत असे. ॥२२॥ ह्रदयांत रामाचें सतत चिंतन चाललें असल्यामुळें ह्याचीं अखिल पापें नष्ट झालीं; शिवाय ह्याला रामाच्या हातून मरण आलें आणि अंतकाळीं रामाचें दर्शन मिळालें; ह्मणून हा त्या आनंदमय प्रभूच्या स्वरूपीं प्राप्त झाला. ॥ २३ ॥ प्राणी ब्राह्मण, राक्षस, पापी किंवा अधर्मी कसा कां असेना; देह-

राममेवाविश[1]द्देवा विस्मयं परमं ययुः ॥ २० ॥ किं कर्म कृत्वा किं प्राप्तः पातकी
मुनिहिंसकः ॥ अथवा राघवस्यायं म[2]हिमा नात्र संशयः ॥ २१ ॥ रामबाणेन
संवि[4]द्धः पूर्वं राममनुस्मरन् ॥ भयात्सर्वं परित्यज्य गृहवित्तादिकं च यत् ॥२२॥
ह्रदि रामं सदा ध्यात्वा निर्धू[5]ताशेषकल्मषः ॥ अंते रामेण निहतः पश्यन् राम-
मवाप सः ॥ २३ ॥ द्विजो वा राक्षसो वा ऽपि पापी वा ऽधार्मिको ऽपि वा ॥

( मू. ). ॥ २० ॥ ' मुनिहिंसकः पातकी ( मू. ). ॥ २१ ॥ ( उ. ) [ तत् ] सर्वं भयात् प[3]रि-
त्यज्य ॥ ( पू. ) ॥ [ स्थितः ] ॥ २२ ॥ ( मू. ) पश्यन् सः [ रामं ] [6]अवाप. ॥ २३ ॥ ( पू. ) ॥

१ अविशत् शिरलें. २ मोठेपणा. ३ टाकून. ४ ताडिलेला. ५ निःशेष धुवून गेलीं सर्व पापें ज्याचीं, असा. ६ पावला.

त्यागाच्या वेळीं रामाचें स्मरण करील तर तो उत्तम पदास पावतो. ' ॥ २४ ॥ ते देव परस्परांशीं असें भाषण करून नंतर स्वर्गी निघून गेले. इकडे रामाच्या मनांत विचार येऊं लागले कीं, " ह्या अधम दैत्यानें मरतां मरतां ॥ २५ ॥ ' हा लक्ष्मणा ! ' असें माझ्या भाषणाचें अनुकरण करून मग प्राण सोडिले ह्याचें कारण काय ? बरें, माझ्या उद्गारासारखे शब्द ऐकून सीतेला तरी काय वाटलें असेल ? " ॥ २६ ॥ अशा काळजीनें रामाचें अंतःकरण व्यापून सोडिलें व तो त्या लांबच्या प्रदेशांतून मागें परतला. इकडे, त्या दुष्ट मारीचाचें वाक्य कानीं आल्याबरोबर सीता ॥ २७ ॥ भिऊन गेली व अतिदुःखाकुल होत्साती

त्यजन्कलेवरं रामं स्मृत्वा याति परं पदम् ॥ २४ ॥ इति ते ऽन्योन्यमाभाष्य[1] ततो देवा दिवं ययुः ॥ रामस्तच्चिन्तयामास[2] म्रियमाणो[3] ऽसुराधमः ॥ २५ ॥

हा लक्ष्मणेति मद्वाक्यमनुकुर्वन्[4] ममार किम्[5] ॥ श्रुत्वा मद्वाक्यसदृशं[6] वाक्यं सीता ऽपि किं[7] भवेत् ॥ २६ ॥ इति चिंतापरीतात्मा[8] रामो दूरान्न्यवर्तत[9] ॥ सीता तद्भाषितं श्रुत्वा मारीचस्य दुरात्मनः ॥ २७ ॥ भीता ऽतिदुःखसंविग्ना[10] लक्ष्मणं त्विदमब्रवीत् ॥

कलेवरं ( मू. ) याति. ' ॥ २४ ॥ ते देवाः ( मू. ) ॥ २५ ॥ (पू) ? ॥ सीता अपि (मू.) श्रुत्वा किं भवेत् ? ॥ २६ ॥ ( मू. ). मारीचस्य तत् भाषितं श्रुत्वा ॥ २७ ॥ ( पू. ) – ॥

---

१ भाषण करून. २ विचार करूं लागला. ३ मरणारा. ४ **अनुकुर्वन्** तसें अनुकरण करणारा ( सारखा शब्द काढणारा ). ५ कां. ६ माझ्या शब्दासारख्या. ७ काय. ८ चिंतेनें व्यापलें मन ज्याचें, असा. ९ परतला. १० अति दुःखानें खिन्न.

सीता लक्ष्मणा-
वर रागावते.

लक्ष्मणाला ह्मणाली :– "लक्ष्मणा! बाबा लवकर जा! तुझ्या भावावर त्या राक्षसानें कांहीं तरी बिकट प्रसंग आणिला आहे! ॥ २८ ॥ 'हा लक्ष्मणा!' असे आपल्या भावाचे शब्द ऐकिले नाहींस काय?" ह्यावर लक्ष्मणानें तिला सांगितलें :– 'देवि जानकी! तें रामाचें भाषण नव्हे. ॥ २९ ॥ त्या क्षुद्र राक्षसानें मरतां मरतां तसे उद्गार काढिले! देवि! जो राम क्रुद्ध झाला तर क्षणमात्रांत त्रैलोक्याचा देखील नाश करूं शकेल, ॥ ३० ॥ - आणि अशा अतुल प्रभावामुळें - देव ज्याचें पूजन करितात, तो प्रभु असें दीन वचन उच्चारील कसें?' सीतेनें रागावून लक्ष्मणावर डोळे वटारिले! तिच्या नेत्रांतून अश्रुधारा चालूं लागल्या! ॥ ३१ ॥ अशा स्थितींत ती लक्ष्मणाला ह्मणाली :– 'लक्ष्मणा, तुझी बुद्धि मला वक्र दिसते! दुष्टा!

गच्छ लक्ष्मण वेगेन भ्राता तेऽसुरपीडितः ॥२८॥ हा लक्ष्मणेति वचनं भ्रातुस्ते न शृणोषि किम् ॥ तामाह लक्ष्मणो देवि रामवाक्यं न तद्भवेत् ॥२९॥ यःकश्चिद्राक्षसो देवि म्रियमाणोऽब्रवीद्वचः ॥ रामस्त्रैलोक्यमपि यः क्रुद्धो नाशयति क्षणात् ॥ ३० ॥ स कथं दीनवचनं भाषतेऽमरपूजितः[1] ॥ क्रुद्धा लक्ष्मणमालोक्य सीता बाष्पविलोचना[2] ॥ ३१ ॥ प्राह लक्ष्मण दुर्बुद्धे भ्रातुर्[3]व्यसन[4]मिच्छसि ॥

'लक्ष्मण, वेगेन गच्छ; ते (मू.) ॥२८॥ ते भ्रातुः (पू.)?' ॥ लक्ष्मणः (मू.) तत् रामवाक्यं न भवेत्. ॥ २९ ॥ देवि, (पू.) [सन्] वचः अब्रवीत् ॥ यः रामः क्रुद्धः [सन्] क्षणात् (मू.), ॥ ३० ॥ अमरपूजितः (पू.) कथं भाषते? लक्ष्मणं आलोक्य (मू.) सीता ॥ ३१ ॥ प्राह – '(पू.)॥

१ देवांनीं पूजिलेला. २ आंसवें नेत्रांत जिच्या, अशी. ३ भावाच्या. ४ दुःखाला.

मावावर वेडा वांकडा प्रसंग यावा अशीच तुझी इच्छा असावी! भरत रामाच्या नाशाची वाटच पाहत राहिला आहे, - आणि मला वाटतें - त्यानेंच तुला - आह्मांबरोबर - पाठविलें. ॥ ३२ ॥ रामाचा नाश झाला ह्मणजे मला घेऊन जावें, एवढ्यासाठीं तूं येथें आला आहेस.- पण पक्कें लक्षांत ठेव कीं, - तुला माझी प्राप्ति होणार नाहीं. ही पहा, मी आतांच येथें प्राण देत्यें ! ॥ ३३ ॥ बायकोला हरण करून न्यावयाची तयारी आणि हें तुझें कृत्रिम रामाच्या कांहीं लक्ष्यांत आलें नाहीं. - पण मी तुला निक्षून सांगत्यें कीं, - रामाशिवाय दुसऱ्याचा–तुझा काय आणि भरताचा काय—मी आपल्याला स्पर्श देखील करून घेणार नाहीं. ' ॥ ३४ ॥ सीता असें बोलून आपल्या हातांनीं स्वतांला बडवून घेऊं लागली; आणि तिनें रडण्यास

प्रेषितो भरतेनैव रामनाशा[१]भिकांक्षिणा ॥ ३२ ॥ मां नेतुमागतोऽसि त्वं रामनाश उप[३]स्थिते ॥ न प्रा[४]प्स्यसे त्वं मामद्य पश्य प्राणांस्त्यजाम्यहम् ॥ ३३ ॥ न जानातीदृशं रामस्त्वां भार्या[५]हरणोद्यतम् ॥ रामादन्यं न स्पृशामि त्वां वा भरतमेव वा ॥ ३४ ॥ इत्युक्त्वा वध्यमाना सा स्वबाहुभ्यां रुरोद ह ॥ तच्छ्रुत्वा लक्ष्मणः कर्णौ पिधार्यातीव दुःखितः ॥ ३५ ॥

(मू.) भरतेन एव प्रेषितः [असि]. ॥ ३२ ॥ त्वं (पू.) ॥ त्वं मां (मू.) अहं प्राणान् त्यजामि. ॥ ३३ ॥ रामः (पू.) त्वां न जानाति. (मू.) न [६]स्पृशामि.' ॥ ३४ ॥ इति उक्त्वा स्वबाहुभ्यां (मू.) लक्ष्मणः आह— ॥ ३५ ॥

---

१ रामाच्या नाशाची इच्छा करणाऱ्या. २ पाठविलेला. ३ प्राप्त झाला असतां. ४ पावशील. ५ पत्नीला हरून नेण्यास तत्पर. ६ स्पर्श करीन. ७ मारून घेणारी. ८ आच्छादून.

रावण आश्रमीं
आला.

प्रारंभ केला. तिचें तें भाषण लक्ष्मणाला ऐकवेना; ह्मणून त्यानें कानांवर हात ठेविले. खरोखर त्याला परमावधि दुःख झालें. ॥ ३५ ॥ ( तो सीतेला ह्मणाला :- ) 'जानकि, तूं फारच तापट बायको आहेस. मला असें बोलतेस, त्याअर्थी तुला धिक्कार असो ! तूं येथून नाहींशी होशील ! ' असें बोलून लक्ष्मणानें सीतेला वनदेवतांच्या स्वाधीन केलें; ॥ ३६ ॥ आणि तो स्वतां अत्यंत दुःखाकुल होत्साता हळूहळू रामाकडेच जावयास निघाला. रावणाला ही संधि सांपडली. तो संन्याशाचें सोंग घेऊन ॥ ३७ ॥ सीतेजवळ आला. त्याच्या हातांत दंड कमंडलु शोभत होते. त्याला पाहिल्याबरोबर तत्काल सीतेनें नमस्कार करून भक्तिपुरःसर त्याची पूजा केली, ॥ ३८ ॥ व कंद मुळें वगैरे अर्पण करून त्याला ह्मटलें :- ' मुने, आपण आलां'

मामेवं भाषसे चण्डि धिक् त्वां नाशमुपैष्यसि॥ इत्युक्त्वा वनदेवीभ्यः समर्प्य जनकात्मजाम् ॥३६॥ ययौ दुःखातिसंविग्नो राममेव शनैः शनैः ॥ ततोऽन्तरं समालोक्य रावणो भिक्षुवेषधृक् ॥३७॥ सीतासमीपमगमत्स्फुरद्दण्डकमण्डलुः ॥ सीता तमवलोक्याशु नत्वा संपूज्य भक्तितः ॥ ३८ ॥ कन्दमूलफलादीनि दत्त्वा स्वागतमब्रवीत् ॥ मुने भुंक्ष्व फलादीनि विश्रमस्व यथासुखम् ॥ ३९ ॥

' चंडि[1] ! ( पू. ).' ॥ ( मू. ). समर्प्य[3] ॥ ३६ ॥ ( पू. ) ययौ. ॥ ( ३७ उ. ) स्फुरद्दण्डकमण्डलुः रावणः सीतासमीपं अगमत्. ॥ ( मू. ) संपूज्य, ॥ ३७ ॥ ३८ ॥ ( पू. ) - ॥ ' मुने, फलादीनि (मू.) विश्रमस्व. ॥ ३९ ॥

१ रागीट स्त्रिये. २ पावशील. ३ स्वाधीन करून. ४ अवकाश ( संधि ). ५ चमकतात दंडकमंडलु ज्याचे असा. ६ विसांवा घे.

फार चांगली गोष्ट झाली. हीं फळें वगैरे भक्षण करून सुखानें विश्रांति घ्यावी. ॥ ३९ ॥ माझे पति आतां लवकरच येतील आणि आपला ह्याच्यापेक्षांही अधिक सत्कार करितील. आपल्या इच्छेस येत असेल, तर येथें बसावें.' ॥ ४० ॥ संन्यासी ह्मणाला :– 'सुंदरि, - तुझें स्वरूप इतकें मनोहर दिसत आहे कीं - त्याला नांव ठेवण्यास यत्किंचित् देखील जागा नाहीं. तुझे नेत्र कमलपत्राप्रमाणें आहेत. तूं कोण, तुझा पति कोण, आणि ह्या राक्षसांनीं घेरलेल्या अरण्यांत कां राहतेस, तें सांग. नंतर मीही आपला सर्व वृत्तांत निवेदन करीन.' ॥ ४१ ॥ सीतेनें उत्तर दिलें :– 'स्वामी! अयोध्यानगरींत दशरथ ह्या नांवाचा महाशूर व श्रीमान् राजा होऊन गेला. त्याचा राम ह्मणून सर्वगुणसंपन्न ज्येष्ठ पुत्र आहे. ॥ ४२ ॥

इदानीमेव भर्ता मे ह्यागमिष्यति ते प्रियम् ॥ करिष्यति विशेषेण तिष्ठ त्वं यदि रोचते ॥ ४० ॥ भिक्षुरुवाच ॥ का त्वं कमलपत्राक्षि को वा भर्ता तवानघे ॥ किमर्थमत्र ते वासो वने राक्षससेविते ॥ ब्रूहि भद्रे ततः सर्वं स्ववृत्तान्तं निवेदये ॥ ४१ ॥ सीतोवाच ॥ अयोध्याधिपतिः श्रीमान् राजा दशरथो महान् ॥ तस्य ज्येष्ठः सुतो रामः सर्वलक्षणलक्षितः ॥ ४२ ॥

इदानीं एव मे (पू.) ॥ विशेषेण (मू.) त्वं तिष्ठ.' ॥४०॥ भि० उ० – 'कमलपत्राक्षि अनघे, त्वं का? तव भर्ता कः वा? ॥ (द्वि.) वने ते वासः किमर्थं? ॥ भद्रे, (मू.).' ॥ ४१ ॥ सी० उ० – '(पू.) दशरथः (मू.) रामः. ॥ ४२ ॥

१ बरें वाटतें. २ सांगतो.

मी त्याची धर्मपत्नी जनकराजाची कन्या सीता. त्याचा लक्ष्मण नामक धाकटा भाऊ आहे; तो आपल्या भावावर पराकाष्ठेची प्रीति करितो. ॥ ४३ ॥ रामचंद्र पित्याची आज्ञा शिरसा वंद्य मानून चवदा वर्षें अरण्यांत राहायाला आला आहे. महाराज, आपला वृत्तांत ऐकावा अशी मला इच्छा आहे तर तो निवेदन करा.' ॥ ४४ ॥ तो संन्यासी सांगूं लागला :– 'जानकी ! मी पौलस्त्याचा पुत्र राक्षसांचा राजा रावण. तुझ्या विषयींच्या कामनेनें तप्त होऊन गेल्यामुळें मी तुला आपल्या राजधानींत नेण्यासाठीं येथें आलों आहें. ॥ ४५ ॥ राम ह्मणजे वैराग्याच्या वेष घेऊन राहणारा ! त्याच्याशीं तूं करणार काय? माझ्या आश्रयानें राहा आणि मजबरोबर यथेच्छ उपभोग भोग. ॥ ४६ ॥

तस्याहं धर्मतः पत्नी सीता जनकनन्दिनी ॥ तस्य भ्राता कनीयांश्च लक्ष्मणो भ्रातृवत्सलः ॥४३॥ पितुराज्ञां पुरस्कृत्य दण्डके वस्तुमागतः॥ चतुर्दश समास्त्वां तु ज्ञातुमिच्छामि मे वद ॥४४॥ भिक्षुरुवाच॥ पौलस्त्यतनयो ऽहं तु रावणो राक्षसाधिपः ॥ त्वत्कामपरितप्तो[1] ऽहं त्वां नेतुं पुरमागतः[2] ॥ ४५ ॥ मुनिवेषेण रामेण किं करिष्यसि मां भज[4] ॥ भुंक्ष्व[5] भोगान्मया सार्धं त्यज दुःखं वनोद्भवम् ॥४६॥

( पू. ) अहं ॥ तस्य कनीयान् ( मू. ) [ अस्ति ]. ॥४३॥ [ रामः ] (पू.) चतुर्दश समाः वस्तुं आगतः. ( मू. ). ॥ ४४ ॥ भि० उ० – ' अहं ( पू. ) रावणः [ अस्मि ]. ॥ ( मू. ) नेतुं[3] आगतः. ॥ ४५ ॥ ( पू. ); ॥ मया सार्धं भोगान् भुङ्क्ष्व; वनोद्भवं दुःखं त्यज. ' ॥ ४६ ॥ ॥ ४६ ॥

१ तुजविषयीं अभिलाषामुळें संतप्त झालेला. २ नगरास. ३ नेण्यासाठीं. ४ आश्रय कर. ५ उपभोग घे.

हें वनवासाचें दुःख सोडून दे.' ॥ ४६ ॥ हें भाषण ऐकतांच सीता भिऊन गेली व आवेशानें त्याला थोडेंसें बोलली: तें येणेंप्रमाणें :– 'दुष्टा! ज्या अर्थी तूं मला असें बोलत आहेस, त्या अर्थी रामाच्या हातून नाश पावशील! ॥ ४७ ॥ क्षणभर दम धर. राम देखील आपल्या धाकट्या भावासह आतां येईलच. अरे! मला भीति दाखविण्यास समर्थ आहे कोण? तसा प्रयत्न करणें ह्मणजे एखाद्या क्षुद्र सशानें सिंहाच्या पत्नीला भेवडावण्याचा आव घालण्यासारखें आहे! ॥ ४८ ॥ रामाच्या बाणांनीं छिन्न विच्छिन्न होऊन भूमितलावर ( धूळ खात ) पडावें लगेल - ठाऊक नाहीं अजून! - ' हें सीतेचें वाक्य कानीं पडतांच रावण क्रोधामुळें देहभान विसरला. ॥ ४९ ॥ त्यानें आपलें प्रचंड पर्वतासारखें रूप प्रकट केलें. दहा मुखें; वीस

श्रुत्वा तद्वचनं सीता भीता किंचिदुवाच तम् ॥ यदेवं भाषसे मां त्वं नाशमेष्यसि राघवात् ॥ ४७ ॥ आगमिष्यति रामोऽपि क्षणं तिष्ठ सहानुजः ॥ मां को धर्षयितुं शक्तो हरेर्भार्यां शशो यथा ॥ ४८ ॥ रामबाणैर्विभिन्नस्त्वं पतिष्यसि महीतले ॥ इति सीतावचः श्रुत्वा रावणः क्रोधमूर्छितः ॥ ४९ ॥ स्वरूपं दर्शयामास महापर्वतसन्निभम् ॥ दशास्यं विंशतिभुजं कालमेघसमद्युति ॥ ५० ॥

तद्वचनं श्रुत्वा भीता ( पू. ) उवाच–' यत् त्वं मां एवं भाषसे, [ ततः ] राघवात् नाशं एष्यसि. ॥ ४७ ॥ सहानुजः रामः अपि ( पू. ) ॥ यथा हरेः भार्यां शशकः, [ तथा ] ( मू. )? ॥४८॥ ( पू. ) पतिष्यसि. ' ॥ ( मू. ) रावणः ॥ ४९ ॥ ( मू. ) स्वरूपं दर्शयामास. ॥ ५० ॥

१ सिंहाच्या. २ ससा. ३ पडशील. ४ दहा मुखें ज्याला, असें. ५ वीस हात ज्याला, असें. ६ काळ्या मेघासारखी कांति ज्याची, असें.

रावण सीतेला घेऊन चालला.

हात; कृष्णवर्ण मेघासारखी कांति; असें ॥ ५० ॥ तें स्वरूप दृष्टीस पडल्याबरोबर वनदेवता आणि एकंदर सर्व प्राणी भिऊन गेले. पुढें, रावणानें - 'सीतेचे पाय भूमीला लागलेले आहेत तोंपर्यंत आपल्याच्यानें तिला उचलून नेणें अशक्य आहे,' असा विचार करून - आपल्या नखांनीं सीतेच्या पायांखालची जमीन उकरली, बाहूंनीं तिला उचलून, ॥ ५१ ॥ तोल संभाळून रथांत घातलें, आणि आकाशमार्गानें तत्काल प्रयाण केलें. ती जनककन्या 'हा रामा! हा लक्ष्मणा!' असें ह्मणून आक्रोश करूं लागली. ॥ ५२ ॥ दीन अबलाच ती, - भयानें इतकी गांगरून गेली कीं - तिच्यानें वर बघवेना; तिची दृष्टि खालीं भूमीकडेच लागून राहिली. सीतेचें तें दीन ओरडणें ऐकून पक्षिराज ॥ ५३ ॥ जटायु लागलाच पर्वताच्या शिखरावरून

तद्दृष्ट्वा वनदेव्यश्च भूतानि च वितत्रसुः ॥ ततो विदार्य धरणीं नखैरुद्धृत्य बाहुभिः ॥ ५१ ॥ तोलयित्वा रथे क्षिप्त्वा ययौ क्षिप्रं विहायसा ॥ हा राम हा लक्ष्मणेति रुदन्ती जनकात्मजा ॥ ५२ ॥ भयोद्विग्नमना दीना पश्यन्ती भुवमेव सा ॥ श्रुत्वा तत्क्रन्दितं दीनं सीतायाः पक्षिसत्तमः ॥ ५३ ॥ जटायुरुत्थितः शीघ्रं नगाग्रात्तीक्ष्णतुण्डकः ॥

(पू.) ॥ ततः रावणः नखैः धरणीं विदार्य, बाहुभिः उत्धृत्य, ॥५१॥ (पू.) ययौ. ॥ (मू.) ॥ ५२ ॥ (पू.) भुवं एव पश्यंती [आसीत्]. ॥ सीतायाः दीनं तत् क्रंदितं श्रुत्वा पक्षिसत्तमः ॥ ५३ ॥ नगाग्रात् शीघ्रं उत्थितः तीक्ष्णतुंडकः जटायुः ॥

१ भ्याल्या. २ भूमीला. ३ फाडून. ४ उचलून. ५ तोलून. ६ ठेवून. ७ जलद. ८ आकाशमार्गानं. ९ भयानें त्रस्त मन जीचें, अशी. १० भूमीला. ११ पर्वताच्या शिखरावरून. १२ तीक्ष्ण चंचु ज्याची, असा.

उठला. त्याची चोंच - शस्त्राप्रमाणें बळकट व - तीक्ष्ण होती. तो रावणाला ह्मणाला :– ‘ अरे ! ज्याप्रमाणें यज्ञांतील मंत्रांच्या योगानें पवित्र झालेला पुरोडाश - ऋत्विजांच्या नकळत - एखाद्या कुत्र्यानें उचलून न्यावा, त्याप्रमाणें, ह्या अरण्यांतील आश्रमांत कोणी नाहीं असें पाहून तूं त्रैलोक्याधिपतीच्या पत्नीला चोरून घेऊन जाण्याचा प्रयत्न करीत आहेस खरा; पण माझ्यापुढें जाणार कोण? ( मी येथें बसलों आहें, तोंपर्यंत सीतेला नेण्याचें कोणालाही सामर्थ्य नाहीं. ) ’ ॥ ९४ ॥ ९९ ॥ असें बोलून जटायूनें आपल्या तीक्ष्ण चंचूच्या योगानें त्याचा रथ मोडून टाकिला ,घोड्यांचे फाडून तुकडे उडविले, आणि पायांनीं धनुष्याचें चूर्ण

तिष्ठ तिष्ठेति तं प्राह को गच्छति ममाग्रतः ॥५४॥ मुषित्वा लोकनाथस्य भार्यां शून्याद्वनालयात् ॥ शुनको मन्त्रपूतं त्वं पुरोडाशमिवाध्वरे ॥५५॥ इत्युक्त्वा तीक्ष्णं तुण्डेन चूर्णयामास तद्रथम् ॥ वाहान्बिभेद पादाभ्यां चूर्णयामास तद्धनुः॥५६॥

तं प्राह – ‘ त्वं तिष्ठ, तिष्ठ; अध्वरे मंत्रपूतं पुरोडाशं शुनकः इव, शून्याद् वनालयात् लोकनाथस्य भार्यां मुषित्वा मम अग्रतः कः गच्छति ? ’ ॥ ९४ ॥ ९९ ॥ ( पू. ) चूर्णयामास ! ॥ ( मू. ) चूर्णयामास. ॥ ९६ ॥

१ यज्ञांत. २ मंत्रांनीं पवित्र, अशा. ३ पुरोडाशनांवाच्या होमद्रव्याला. ४ कुत्रा. ५ ज्यांत कोणी रक्षक नाहीं अशा. ६ अरण्यांतील आश्रमांतून. ७ जगाच्या अधिपतीच्या. ८ चोरून. ९ पुढून. १० तीक्ष्ण चोंचीनें. ११ घोड्यांना. १२ फाडिता झाला. १३ त्याच्या धनुष्याला. १४ चुरिता झाला.

जटायुरावणां-
चा संग्राम.

करून सोडिलें. ॥ ५६ ॥ तेव्हां रावणानें क्रोधाविष्ट होऊन सीतेला सोडून दिलें आणि खड्ग घेऊन त्या बुद्धिमान् व उदार पक्षिराजाचे पंख तोडिले. ॥ ५७ ॥ तत्काल तो पक्षिराज जटायु - मरणोन्मुख होऊन - भूमीवर पडला. त्याच्या प्राणांची उगीच कोठें थोडी धुगधुगी राहिली होती. इकडे, रावणानें - मायेच्या योगेंकरून - पुन्हां दुसरा रथ उत्पन्न केला, त्यांत सीतेला ठेविलें आणि लागलाच - आपल्या राजधानीचा रस्ता धरिला. - ॥ ५८ ॥ सीतेला आपलें रक्षण करणारा कोणीच मिळेना, तेव्हां एकावर एक हुंदके येऊं लागले. 'हा रामा ! हा आनंददायका ! हा त्रैलोक्यनाथा रामचंद्रा ! मी संकटांत पडलयें आहें, हें आपल्याला - अजून कसें - दिसत नाहीं ! ॥ ५९ ॥ रघुपते ! हा राक्षस आपल्या धर्मपत्नीला घेऊन चालला !

ततः सीतां परित्यज्य रावणः खड्गमाददे ॥ चिच्छेद पक्षौ सामर्षः पक्षिराजस्य धीमतः ॥ ५७ ॥ पपात किंचिच्छेषेण प्राणेन भुवि पक्षिराट् ॥ पुनरन्यरथेनाशु सीतामादाय रावणः ॥ ५८ ॥ क्रोशन्ती राम रामेति त्रातारं नाधिगच्छती ॥ हा राम हा जगन्नाथ मां न पश्यसि दुःखिताम् ॥ ५९ ॥ रक्षसा नीयमानां स्वां भार्यां मोचय राघव ॥ हा लक्ष्मण महाभाग त्राहि मामपराधिनीम् ॥ ६० ॥

ततः सामर्षः रावणः ( मू. ) धीमतः पक्षिराजस्य पक्षौ चिच्छेद. ॥ ५७ ॥ पक्षिराट् (पू.) पपात. ॥ रावणः ( उ. ) [ अगच्छत् ]. ॥५८॥ ' राम ! राम ! ' इति ( पू. ) [सीता] ॥' ( उ. ) ! दुःखितां मां [ किं ] न पश्यसि ! ' [ इति विललाप ]. ॥ ५९ ॥ ' राघव ! ( मू. ) मां त्राहि. ॥ ६० ॥

१ रागावलेला. २ तोडिता झाला. ३ रक्षण करणाराला. ४ न पावणारी. ५ राक्षसानें. ६ नेली जाणाऱ्या. ७ सोडव. ८ अपराध केला जिनें, अशा. ९ रक्षण कर.

हिला सोडवा हो ! लक्ष्मणा ! तूं सद्गुणांचा केवल निधि आहेस. मी तुझा अपराध केला, - पण तें लक्षांत न धरितां आतां येऊन - माझें रक्षण कर. ॥ ६० ॥ भावोजी ! मी तुह्मांला बोलूं नयेत असे अपशब्द बोललयें ! त्या वाग्बाणांनीं तुमच्या हृदयाला क्षतें पडलीं असतील ! पण आतां मला क्षमा करा ! ' अशा प्रकारें सीतेनें एकसारखा विलाप चालविला होता. पण रावण तिकडे लक्ष न देतां, - राम येईल ह्या भीतीमुळें तिला घेऊन सत्वर वायुवेगानें निघून चालला. ॥ ६१ ॥ रावण आकाशांतून सीतेला घेऊन चालला तेव्हां ती अधोवदन ( किंवा भूमीकडे दृष्टि लावून ) बसली होती. इतक्यांत, पर्वताच्या शिखरावर बसलेले पांच वानर त्या कमलवदनेच्या दृष्टीस पडले. ॥ ६२ ॥ तत्काल तिनें आंगावरील अलंकार उतरिले, उत्तरीय वस्त्राचा

> वाक्शरेण[2] हतस्त्वं मे क्षन्तुम्[3]र्हसि देवर ॥ इत्येवं क्रोशमानां[4] तां रामागमनशंकया ॥ जगाम वायुवेगेन सीतामादाय सत्वरः ॥ ६१ ॥ विहायसा[5] नीयमाना सीता ऽपश्यदधोमुखी[6] ॥ पर्वताग्रस्थितान्[7]पञ्च वानरान्वारिजानना ॥ ६२ ॥ उत्तरीयार्ध[10]खण्डेन विमुच्या[9]भरणादिकम्[8] ॥

देवर[1] ! ( पू. ) ! ' ॥ इति एवं आक्रोशमानां तां सीतां आदाय [ रावणः ] रामागमनशंकया सत्वरः विहायसा वायुवेगेन जगाम. ॥ ६१ ॥ ( मू. ) सीता पर्वताग्रस्थितान् पंच वानरान् अपश्यत्. ॥ ६२ ॥ आभरणादिकं विमुच्य ( पू. ) ॥

---

१ भावोजी. २ भाषणरूपी बाणांनीं. ३ क्षन्तुम् क्षमा करण्यास. ४ ओरडणाऱ्या. ५ आकाशमार्गानें. ६ अधोभागीं मुख जिचें ( केलें जिनें ), अशी. ७ पर्वताच्या शिखरावर बसलेल्या. ८ अलंकार वगैरे. ९ सोडून. १० पदराच्या अर्ध्या तुकड्यानें.

त्यानें तिला अशोकवनीं ठेविलें.

अर्धा तुकडा फाडून त्यांत बांधिले आणि ' त्यांनीं ( वानरांनीं ) रामाला कळवावें ' अशा उद्देशानें पर्वतावर फेंकून दिले. - पहा स्त्रियांची समयसूचकता कशी आहे ती ! असो. - ॥ ६३ ॥ पुढें तो रावण समुद्र उल्लंघून लंकेंत गेला. ॥ ६४ ॥ त्यानें सीतेला आपल्या अंतःपुरासंबंधीं एकांत स्थलांतील अशोक वनांत ठेवून दिलें; तिच्या भोंवतीं रक्षणासाठीं राक्षसी ठेविल्या, आणि मातृबुद्धीनें तिचें पालन चालविलें. ॥ ६५ ॥ - सीतेची विपन्न अवस्था किती वर्णावी ! - ती उत्तरोत्तर कृश होत चालली, नेहमीं अत्यंत दीनासारखी असे, अभ्यंगस्नान वेणी घालणें इत्यादि उपचार कधींही करीत नसे; दुःखामुळें तिचें मुख शुष्क होऊन गेलें; व ती अत्यंत व्याकुल होत्साती ' हा रामा ! हा रामा ' असा विलाप करीत त्या राक्षसांच्या मेळ्यांत

बद्ध्वा[1] चिक्षेप[2] रामाय कथयंत्विति[3] पर्वते ॥ ६३ ॥ ततः समुद्रमुल्लंघ्य लंकां गत्वा स रावणः ॥ ६४ ॥ स्वान्तःपुरे रहस्ये तामशोकविपिने[4] ऽक्षिपत् ॥ राक्षसीभिः परिवृतां[5] मातृबुद्ध्या ऽनुपालयत्[6] ॥ ६५ ॥ कृशा ऽतिदीना परिकर्मवर्जिता[7] दुःखेन शुष्यद्वदना[8] ऽतिविह्वला ॥ हा राम रामेति विलप्यमाना सीता स्थिता राक्षसवृन्दमध्ये[9] ॥ ६६ ॥ इति श्रीमद० रामा० उ० अरण्यका० सप्तमः सर्गः ॥७॥

(मू.)चिक्षेप[10].॥६३॥ततः सः रावणः(मू.),॥६४॥एतां(मू.).॥६५॥(मू.) स्थिता.॥६६॥इति सप्तमः सर्गः ॥

१ बांधून. २ कथयन्तु सांगोत. ३ फेंकिती झाली. ४ अशोक वृक्षांच्या वनांत. ५ ठेविता झाला. ६ वेष्टिलेल्या. ७ ' आई ' अशा बुद्धीनें. ८ पाळिता. झाला. ९ अभ्यंगस्नान अंगमर्दन इत्यादि संस्कार वर्ज्य केले जिनें अशी. १० शुष्क होत चाललें मुख जिचें, अशी. ११ राक्षसांच्या समुदायामध्यें.

राहिली ! ॥ ६६ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणार्थबोधे अरण्यकांडे सप्तमःसर्गः ॥ ७ ॥
इकडे, रामचंद्र त्या मायावी आणि इच्छेस येईल तसें रूप घेणाऱ्या मारीच राक्षसाचा वध करून परत आश्रमीं येण्यास निघाला तों दुरूनच, लक्ष्मण येत आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. ह्या वेळीं लक्ष्मण दीन झाला असून त्याचें मुख अगदीं सुकून गेलें होतें. रामचंद्र महाबुद्धिमान् व सर्वज्ञ असल्यामुळें - झालेली सर्व गोष्ट त्याला कळली होती. - पण सांप्रत त्यानें आपल्या मनाशींच असा विचार ठरविला कीं , ॥१॥२॥ ' मी मायेची सीता उत्पन्न केली आहे, ही गोष्ट लक्ष्मणाला माहीत नाहीं. ह्मणून, जरी मला सर्व प्रकार विदित आहे, तथापि ह्याला फसवून आपण अज्ञानी प्राण्याप्रमाणें शोक करावा. ॥ ३ ॥ कारण, जर मी उदासीन

रामो मायाविनं हत्वा राक्षसं कामरूपिणम् ॥ प्रतस्थे स्वाश्रमं गन्तुं ततो दूराद्ददर्श तम् ॥ १ ॥ आयान्तं लक्ष्मणं दीनं मुखेन परिशुष्यता ॥ राघवश्चिन्तयामास स्वात्मन्येव महामतिः॥ २॥ लक्ष्मणस्तन्न जानाति मायासीतां मया कृताम् ॥ ज्ञात्वा ऽप्येनं वञ्चयित्वा शोचामि प्राकृतो यथा ॥३॥ यद्यहं विरतो भूत्वा तूष्णीं स्थास्यामि मन्दिरे ॥

( पू. ) राक्षसं हत्वा ॥ स्वाश्रमं गंतुं ( मू. ) ददर्श. ॥ १ ॥ महामतिः राघवः ( पू. ) मुखेन [ उपलक्षितं ] लक्ष्मणं [ दृष्ट्वा ] ( मू. ) चिन्तयामास – ॥ २ ॥ ' ( पू. ) मायासीतां न जानाति. ॥ ( मू. ) यथा प्राकृतः [ तथा ], शोचामि. ॥ ३ ॥ ( पू. ) स्थास्यामि ॥

---

१ इच्छेस येईल तें रूप घेणाऱ्या. २ जाण्यास. ३ निघाला. ४ येणाऱ्या. ५ सुकणाऱ्या. ६ युक्त. ७ फसवून. ८ अज्ञानी. ९ शोक करितों. १० विराम पावलेला. ११ गपचिप. १२ राहीन.

रामाचे मानसिक विचार.

होऊन मंदिरांत स्वस्थ बसलों, तर कोट्यावधि राक्षसांच्या वधाचा उपाय सिद्ध होईल कसा? ॥ ४ ॥ जर मी एखाद्या कामुक मनुष्याप्रमाणें दुःखानें संतप्त होऊन सीतेसाठीं शोक करण्याचा आव आणिला, तरच मला क्रमाक्रमानें तिचा शोध करण्यासाठीं राक्षसांच्या राजधानीस जाण्याचा घाट जमवितां येईल. ॥ ५ ॥ मग मी आळस न करितां गणगोतासह रावणाचा वध करीन. सीता, मीच ठेविल्यामुळें, सध्यां अग्नींत गुप्तपणें राहिली आहे. रावणाचा वध केल्यावर पुन्हां तिला घेऊन मी अयोध्येस जाईन. ब्रह्मदेवाच्या प्रार्थनेवरून मला मनुष्य अवतार घ्यावा लागला आहे; ॥६॥ मी ह्या मनुष्यरूपानें कांहीं कालपर्यंत पृथ्वीवर राहीन. नंतर, जे लोक मायेनें धारण केलेल्या ह्या माझ्या मनुष्य अवताराचें चरित्र श्रवण करितील, त्यांना ॥ ७ ॥

तदा राक्षसकोटीनां वधोपायः कथं भवेत् ॥ ४ ॥ यदि शोचामि तां दुःखसंतप्तः कामुको यथा ॥ तदा क्रमेणानुचिन्वन्सीतां यास्ये ऽसुरालयम् ॥ ५ ॥ रावणं सकुलं हत्वा सीतामग्नौ स्थितां पुनः ॥ मयैव स्थापितां नीत्वा याता ऽयोध्यामतन्द्रितः ॥ अहं मनुष्यभावेन जातो ऽस्मि ब्रह्मणा ऽर्थितः ॥ ६ ॥ मनुष्यभावमापन्नः किंचित्कालं वसामि कौ॥ततो मायामनुष्यस्य चरितं मे ऽनुशृण्वताम्॥७॥

( मू. )! ॥ ४ ॥ दुःखसंतप्तः अहं, यथा कामुकः [ तथा ], यदि तां शोचामि, ॥ ( मू. ) अनुचिन्वन् [ सन् ] असुरालयं यास्ये. ॥ ५ ॥ अतन्द्रितः अहं सकुलं ( पू. ॥ द्वि. ) सीतां नीत्वा अयोध्यां याता. ॥ ब्रह्मणा अर्थितः ( मू. ). ॥ ६ ॥ ( पू. ) वसामि. ॥ ततः ( मू. ) ॥ ७ ॥

१ शोधणारा. २ राक्षसाच्या घराला. ३ जाईन. ४ निराळस. ५ प्रार्थिलेला. ६ पृथ्वीवर. ७ ऐकणारांना.

आयासावांचून मुक्ति प्राप्त होईल. मात्र त्यांनीं भक्तिमार्गाचें अवलंबन केलें पाहिजे.' रामचंद्रानें आपल्या मनाशीं असा निश्चय ठरविला. इतक्यांत लक्ष्मण - जवळ येऊन पोंचला असें - त्याच्या दृष्टीस पडलें. तेव्हां तो लक्ष्मणाला ह्मणाला :– ॥ ८ ॥ 'अरे ! तूं माझ्या प्रिय सीतेला सोडून इकडे आलास कां ? जानकीला राक्षसांनीं उचलून नेलें किंवा भक्षिलें नाहींना ?' ॥ ९ ॥ ह्यावेळीं लक्ष्मणाला सीतेचे अपशब्द आठवल्यामुळें रडूं कोसळलें. त्यानें हात जोडून रामाला सांगितलें :– "रघुवीरा, 'हा लक्ष्मणा !' असे राक्षसानें काढलेले उद्गार सीतेच्या कानीं गेले. ॥ १० ॥ तुझ्या भाषणासारखें तें वाक्य ऐकूं येतांच - घाबरून -

मुक्तिः स्यादप्रयासेन भक्तिमार्गानुवर्तिनाम् ॥ निश्चित्यैवं तदा दृष्ट्वा लक्ष्मणं वाक्यमब्रवीत् ॥८॥ किमर्थमागतोऽसि त्वं सीतां त्यक्त्वा मम प्रियाम् ॥ नीता वा भक्षिता वाऽपि राक्षसैर्जनकात्मजा ॥ ९ ॥ लक्ष्मणः प्राञ्जलिः प्राह सीताया दुर्वचो रुदन् ॥ हा लक्ष्मणेति वचनं राक्षसोक्तं श्रुतं तया ॥ १० ॥ त्वद्वाक्यसदृशं श्रुत्वा मां गच्छेति त्वरा ऽब्रवीत् ॥ रुदती सा मया प्रोक्ता देवि राक्षसभाषितम् ॥ नेदं रामस्य वचनं स्वस्था भव शुचिस्मिते ॥ ११ ॥

( पू. ) अप्रयासेन मुक्तिः स्यात्.' ॥ तदा एवं निश्चित्य लक्ष्मणं ( मू. ) – ॥ ८ ॥ 'त्वं मम प्रियां सीतां त्यक्त्वा (पू.) ? ॥ राक्षसैः जनकात्मजा (मू.) ?' ॥ ९ ॥ प्रांजलिः ( पू. ) सीतायाः दुर्वचः [स्मृत्वा] रुदन् [सन्] प्राह – 'तया (मू.) वचनं श्रुतं. ॥१०॥ (मू.) शुचिस्मिते, स्वस्था भव. ॥११॥

१ ठरवून. २ टाकून. ३ आठवून. ४ रडणारा. ५ त्वरेनें. ६ शुभ्र हास्य जिचें, अशा.

अ-रा-बो.
सभू-सान्व.
सटिप्पण.
॥९१॥

अर. कांड.
सर्ग ८

लक्ष्मणाला दोहींकडून बोलणी !

तिनें रडत रडत मला सांगितलें कीं, लवकर तिकडे जा. मी तिला ह्मटलें, 'देवि, हे शब्द राक्षसाचे आहेत, रामाचे नव्हत. सुहास्यवदने, स्वस्थ राहा.' ॥ ११ ॥ अशा प्रकारें मी त्या साध्वीचें सांत्वन केलें. - त्यामुळें तिचें समाधान तर झालें नाहींच; पण उलट - ती मला जे कांहीं अपशब्द बोलली ते, रामा, तुझ्यापुढें उच्चारूं देखील नयेत !॥ १२॥ मी कानांवर हात देऊन निघून तुझ्या दर्शनासाठीं इकडे आलों." ह्यावर राम लक्ष्मणाला ह्मणाला :–' लक्ष्मणा ! तथापि, तूं केलेंस हें अयोग्यच होय. ॥१३॥ अरे! बायकोचें बोलणें खरें धरून तूं त्या सुवदनेला सोडून - आलास ! हें काय? - राक्षसांनीं तिला नेलें किंवा खाल्लें असावें, ह्यांत संशय नाहीं ! ' ॥१४॥ रामचंद्र अशा प्रकारें चिंताग्रस्त होत्साता त्वरेनें आपल्या आश्रमांत आला. तेथें जानकी कोठें दिसेना. तेव्हां

इत्येवं सान्त्विता साध्वी मया प्रोवाच मां पुनः ॥ यदुक्तं दुर्वचो राम न वाच्यं पुरतस्तव॥१२॥कर्णौ[1] पिधाय निर्गत्य[2] यातो ऽहं त्वां समीक्षितुम्[3] ॥रामस्तु लक्ष्मणं प्राह तथा ऽप्यनुचितं कृतम् ॥१३॥ त्वया स्त्रीभाषितं सत्यं कृत्वा त्यक्त्वा शुभाननाम् ॥ नीता वा भक्षिता वा ऽपि राक्षसैर्नात्र संशयः ॥ १४ ॥ इति चिन्तापरो रामः स्वाश्रमं त्वरितो ययौ ॥ तत्रादृष्ट्वा जनकजां विललापातिदुःखितः ॥ १५ ॥

मया ( पू. ) प्रोवाच. ॥ राम, [ तया ] यत् दुर्वचः उक्तं [ तत् ] तव पुरतः न वाच्यम्. ॥ १२ ॥ अहं (पू.) यातः. ' ( १३ उ. १४ पू. ) सक्त्वा अनुचितं कृतं. ॥ [ सा ] राक्षसैः (मू.) ! ॥ १३ ॥ ॥ १४ ॥ (मू.) अदृष्ट्वा अतिदुःखितः [ सन् ] विललाप – ॥ १५ ॥

॥९१॥

१ झांकून. २ बाहेर निघून. ३ पाहण्यास. ४ अयोग्य. ५ रडूं लागला.

तो अत्यंत दुःखाकुल होऊन विलाप करूं लागला :–॥१९॥'हा प्रिये ! तूं गेलीस तरी कोठें ? पूर्वींप्रमाणें आज मला आश्रमामध्यें दिसत नाहींस ! ' 'अथवा, माझी थट्टा करावी किंवा मला मोहांत पाडावें ह्यासाठीं लीलेनें कोठें लपून बसली आहेस काय ? ' ॥ १६ ॥ असें ह्मणून त्यानें वनामध्यें सर्वत्र शोध केला; परंतु जानकी कोठेंही सांपडेना; तेव्हां तो अरण्यांतील स्थावरजंगम पदार्थांना विचारीत सुटला : – 'वनदेवतांनो ! माझी प्रिया सीता कोठें आहे, सांगा. ॥ १७ ॥ हे पशुपक्ष्यांनो ! वृक्षहो ! माझी प्रिया मला दाखवून द्या. ' अशा प्रकारें रामानें विलाप चालविला. सीता त्याला कोठेंही ॥ १८ ॥ कांहीं केल्या दिसेना. ( शंकर ह्मणाले :– पार्व-

हा प्रिये क्व गता ऽसि त्वं नासि पूर्ववदाश्रमे ॥ अथवा मे[१]द्धिमोहार्थं लीलया क्व वि-लीयसे ॥१६॥ इत्याचिन्वन्वनं सर्वं नापश्यज्जानकीं तदा ॥ वनदेव्यः कुतः सीतां ब्रुवन्तु मम वल्लभाम् ॥१७॥ मृगाश्च पक्षिणो वृक्षा दर्शयन्तु मम प्रियाम् ॥ इत्येवं विलपन्नेव रामः सीतां न कुत्रचित् ॥१८॥ सर्वज्ञः सर्वथा क्वापि नापश्यद्रघुनन्दनः॥ आनन्दो ऽप्यन्वशो[६]चत्तामचलो ऽप्यनुधावति ॥ १९ ॥

' ( पू. ) न असि ! ( मू. ) ! ' ॥१६॥ ( पू. ) वनं आचिन्वन् [रामः] तदा जानकीं न अपश्यत्. ॥ ' ( मू. ) ब्रुवन्तु. ॥ १७ ॥ ( पू. ) दर्शयंतु. ' ॥ ( मू. ) न [ ददर्श. ] ॥ १८ ॥ सर्वज्ञः रघुनन्दनः ( पू. ) ! ॥ आनन्दः अपि तां (मू.) ! ॥ १९ ॥

---

१ मला मोह पाडण्यासाठीं. २ लपून बसलीस. ३ शोधणारा. ४ सांगोत. ५ दाखवोत. ६ **अशोचत्** शोक करिता झाला. ७ न हलणारा. ८ **अनुधावति** मागून धांवतो.

'हें खरें आणि हें खोटें !'

ति !) - वास्तविक पाहिलें तर - रामचंद्र सर्वज्ञ; - पण त्यानें अज्ञान्याचें पूर्ण सोंग आणिलें होतें ! - तो परमानंदरूप असूनही सीतेसाठीं शोक करूं लागला ! परमार्थतः तो कोणतीही क्रिया न करणारा, पण ह्या वेळीं सैरांवैरां धांवत सुटला ! ॥१९॥ - त्याचें सत्य स्वरूप ह्मटलें तर - अहंममतारहित व नित्य आनंदमय आहे; परंतु ह्यावेळीं तो 'माझी सीता ! माझी बायको !' असें ह्मणत आणि अत्यंत दुःखित होत्साता विलाप करीत बसला ! ॥ २० ॥ पार्वति ! रघुवीर कोणत्याही ठिकाणीं आसक्ति ठेवीत नाहीं; पण त्यावेळीं मायेच्या अनुरोधानें वागत होता, - हा तथ्य प्रकार आहे. - अज्ञानी लोकांना तो आसक्त झाल्याप्रमाणें भासे; तत्त्ववेत्त्यांना मात्र तसें वाटलें नाहीं, ( ते सत्य जाणत असत ). ॥ २१ ॥ अशा प्रकारें रामचंद्र लक्ष्मणाला बरोबर घेऊन सगळ्या वनामध्यें शोध करीत असतां, एक मोडलेला रथ, फाटलेलें छत्र, तुकडे झालेलें धनुष्य

निर्ममो निरहंकारो ऽप्यखण्डानन्दरूपवान् ॥ मम जायेति सीतेति विललापातिदुःखितः ॥ २० ॥ एवं मायामनुचरन्नसक्तो ऽपि रघूत्तमः ॥ आसक्त इव मूढानां भाति तत्त्वविदां न हि ॥ २१ ॥ एवं विचिन्वन्सकलं वनं रामः सलक्ष्मणः ॥ भग्नं[1] रथं छत्रचापं[2] कूबरं पतितं भुवि ॥ २२ ॥

(मू.) [ इव ] विललाप ! ॥२०॥ (मू.). ॥२१॥ (पू.) विचिन्वन् सलक्ष्मणः रामः (मू.) भुवि[3] पतितं कूबरं[4] ॥ २२ ॥

१ मोडलेल्या. २ छत्र आणि धनुष्य यांना. ३ भूमीवर. ४ जूं.

आणि भूमीवर पडलेलें जूं—इतक्या वस्तु त्याच्या ॥ २२ ॥ दृष्टीस पडल्या. तेव्हां तो लक्ष्मणाला ह्मणाला :— ‘ लक्ष्मणा ! हें पहा ! कोणीतरी राक्षस जानकीला नेत होता; पण त्याला जिंकून दुसऱ्यानेंच तिला नेलें असावें. ’ ॥ २३ ॥ नंतर आणखी थोडासा प्रदेश चालून गेल्यावर तेथें रामाला पर्वतासारखें एक रक्तानें भरलेलें शरीर दिसलें. तेव्हां तो पुन्हां ह्मणाला :— ॥ २४ ॥ ‘ निःसंशय हा प्राणी त्या स्वरूप संपन्न जानकीला भक्षून आतां आहारून एकांतांत स्वस्थ पडून राहिला आहे; पहा ! मी आतां ह्या राक्षसाला मारून टाकितों. ॥ २५ ॥ रघुनंदना ( लक्ष्मणा ) ! मला लवकर धनुष्य आणि बाण आणून दे.’

दृष्ट्वा[1] लक्ष्मणमाहेदं पश्य लक्ष्मण केनचित् ॥ नीयमानां जनकजां तं जित्वा ऽन्यो जहार ताम् ॥२३॥ ततः कंचिद्भुवो भागं गत्वा पर्वतसन्निभम्[2] ॥ रुधिरात्तवपुर्दृष्ट्वा[3] रामो वाक्यमथाब्रवीत् ॥२४॥ एष वै भक्षयित्वा तां जानकीं शुभदर्शनाम्[4] ॥ शेते[5] विविक्ते ऽतितृप्तः पश्य हन्मि निशाचरम् ॥ २५ ॥ चापमानय शीघ्रं मे बाणं च रघुनन्दन ॥ तच्छ्रुत्वा रामवचनं जटायुः प्राह भीतवत् ॥ २६ ॥

दृष्ट्वा लक्ष्मणं आह – ‘ (मू.) [दृष्ट्वा] अन्यः तं जित्वा तां जहार. इदं पश्य. ’ ॥ २३ ॥ अथ रामः ( मू. ) – ॥ २४ ॥ ‘ ( पू. ) जानकीं भक्षयित्वा ॥ अतितृप्तः[6] [ सन् ] विविक्ते[7] ( मू. ) हन्मि[8]. ॥ २५ ॥ रघुनन्दन, (पू.) शीघ्रं आनय. ’ ॥ जटायुः (मू.) श्रुत्वा भीतवत् प्राह – ॥ २६ ॥

---

१ नेता झाला. २ पर्वतासारख्या. ३ रक्तानें भरलेल्या शरीराला. ४ शुभ दर्शन जिचें, अशा. ५ आहारलेला. ६ एकांतीं. ७ निजतो ८ मारतों.

जटायु रामाची प्रार्थना करितो.

तें रामाचें वचन ऐकतांच जटायु भ्यालयासारखा झाला, आणि रामाला ह्मणाला :– ॥ २६ ॥ ‘ रामचंद्रा ! मी आपल्या कर्मानेंच मरत आहें. मला मारूं नकोस. तुझें कल्याण असो. बा ! मी जटायु आहें, - राक्षस नव्हें. - मी तुझ्या भार्येला चोरून नेणाऱ्या रावणाच्या आंगावर चालून गेलों; हे शत्रुनाशका, तेथें त्याचें माझें युद्ध झालें. मी त्याचे घोडे मारिले, रथ मोडिला आणि धनुष्याचे तुकडे उडविले. शेवटीं त्यानें मजवर खड्गप्रहार केले; ॥ २७ ॥ २८ ॥ त्यामुळें मी येथें पडलों आहें. त्रैलोक्यनाथा, आतां मी प्राणत्याग करणार. मजकडे - कृपादृष्टीनें - अवलोकन कर.’ रामचंद्रानें तें भाषण ऐकिलें व दीन आणि कंठीं प्राण येऊन पडलेल्या त्या जटायूकडे पाहिलें. ॥ २९ ॥ त्यावेळीं रामाचे नेत्र दुःखाश्रूंनीं भरून आले. त्यानें

मा न मारय भद्रं ते म्रियमाणं स्वकर्मणा ॥ अहं जटायुस्ते भार्याहारिणं समनुद्रुतः ॥ २७ ॥ रावणं तत्र युद्धं मे बभूवारिविमर्दन ॥ तस्य वाहान् रथं चापं छित्वा ऽहं तेन घातितः ॥ २८ ॥ पतितो ऽस्मि जगन्नाथ प्राणांस्त्यक्ष्यामि पश्य माम् ॥ तच्छ्रुत्वा राघवो दीनं कण्ठप्राणं ददर्श ह ॥ २९ ॥ हस्ताभ्यां संस्पृशन् रामो दुःखाश्रुवृतलोचनः ॥ ३० ॥

‘ते भद्रं. स्वकर्मणा म्रियमाणं (पू.). ॥ जटायुः (बा.२७उ.) रावणं समनुद्रुतः. अरिविमर्दन, मे (मू.) [स्थितः] अहं तेन घातितः, ॥२७॥२८॥ (पू.) पश्य.’ ॥ (मू). ॥२९॥ (मू.) रामः [आह–] ॥३०॥

---

१ बायकोला नेणाऱ्याला. २ घोड्यांना. ३ मारिलेला. ४ टाकीन. ५ कंठीं प्राण ज्याचे, अशा. ६ कुरवाळणारा. ७ दुःखाश्रूंनीं भरले नेत्र ज्याचे, असा.

आपल्या हातांनीं जटायूला कुरवाळून ह्मटलें :– ॥ ३० ॥ ‘ बा जटायो ! माझी सुवदना भार्या कोणी नेली, तेवढें सांग. माझ्या कार्यासाठीं तुझा वध झाला, त्या अर्थीं तूं माझा प्रिय बांधव आहेस. ’ ॥ ३१ ॥ जटायु अगदीं आंत ओढलेल्या स्वरानें बोलूं लागला : त्याच्या मुखांतून अद्यापि रक्त वाहतच होतें : तो ह्मणाला :–‘ रामा ! रावण नांवाचा एक उग्रप्रतापी राक्षस, ॥ ३२ ॥ जनक राजाची कन्या जी सीता, तिला घेऊन दक्षिण दिशेच्या धोरणानें गेला. ह्याच्यापुढें बोलण्याची मला शक्ति नाहीं. आतां मी तुझ्या अग्रभागीं प्राण सोडितों. ॥ ३३ ॥ हे पुण्यपुरुषा रामचंद्रा, मरणसमयीं मला तुझें दर्शन घडलें, ही मोठ्या

जटायो ब्रूहि मे भार्या केन नीता शुभानना ॥ मत्कार्यार्थं हतो ऽसि त्वमतो मे प्रियबान्धवः ॥३१॥ जटायुः सं[1]न्नया वाचा वक्त्राद्रक्तं समुद्वमन् ॥ उवाच रावणो राम राक्षसो भीमवि[2]क्रमः ॥ ३२ ॥ आदाय मैथिलीं सीतां दक्षिणाभिमुखो ययौ ॥ इतो वक्तुं न मे शक्तिः प्राणांस्त्यक्ष्यामि ते ऽग्रतः ॥३३॥ दिष्ट्या दृष्टो ऽसि राम त्वं म्रियमाणेन मे ऽनघ ॥ परमात्मा ऽसि विष्णुस्त्वं मायामनुजरूपधृक् ॥ ३४ ॥

‘ ( पू. ) भार्या केन नीता ? त्वं (मू.).’ ॥ ३१॥ व[3]क्त्रात् रक्तं स[4]मुद्वमन ( मू. ) रावणः ॥३२॥ मै[5]थिलीं सीतां (मू.) त्यक्ष्यामि. ॥ ३३ ॥ अनघ, राम, म्रियमाणेन मया त्वं दृष्टः असि; दि[8]ष्ट्या ! ( मू. ) असि. ॥ ३४ ॥

१ आंत ओढलेल्या. २ भयंकर पराक्रम ज्याचा, असा. ३ मुखांतून. ४ ओकणारा. ५ मिथिला नगरीच्या राजाच्या कन्येला. ६ दक्षिणेकडे तोंड करणारा. ७ बोलण्यास. ८ आनंदाची गोष्ट.

अ-रा-बो.
समू-सान्त्र.
साटेप्पण.
॥९४॥

अर-कांड.
सर्ग ८
जटायूचें उत्तर कार्य.

भाग्याची गोष्ट. तूं साक्षात् परमेश्वर विष्णु मायेनें मनुष्यरूप घेऊन राहिला आहेस. ॥ ३४ ॥ रघुवीरा, अंतकालीं तुझें दर्शन मिळाल्यामुळें मी मुक्त आहें. रामा, तूं आपल्या हातांनीं मला आणखी एकदां कुरवाळ; ह्मणजे मी तुझ्या पदास जाईन.' ॥ ३९ ॥ रामानें 'बरें आहे.' असें ह्मणून त्याच्या आंगावरून हात फिरविला. - त्याचा शुद्ध भाव पाहून रामाला संतोष वाटला व - हांसू आलें. नंतर जटायु प्राण सोडून भूमीवर पडला. ॥ ३६ ॥ रामानें प्रत्यक्ष बंधूप्रमाणें त्याच्याबद्दल शोक केला. त्याच्या नेत्रांत दुःखाश्रूंचें भरतें आलें. पुढें त्यानें लक्ष्मणाकडून काष्ठें आणवून त्याचें दहन केलें. ॥ ३७ ॥ तदनंतर रामानें लक्ष्मणासह दुःखानें स्नान करून अरण्यांत एक मृग मारिला आणि त्याच्या मांसाचे तुकडे त्या ठिकाणीं आसपास॥३८॥

अन्तकाले ऽपि दृष्ट्वा त्वां मुक्तो ऽहं रघुसत्तम ॥ हस्ताभ्यां स्पृश मां राम पुनर्यास्यामि ते पदम् ॥३५॥ तथेति रामः पस्पर्श तदंगं पाणिना स्मयन् ॥ ततः प्राणान्परित्यज्य जटायुः पतितो भुवि ॥३६॥ रामस्तमनु शोचित्वा बन्धुवत्साश्रुलोचनः॥ लक्ष्मणेन समानाय्य काष्ठानि प्रददाह तम्॥३७॥ स्नात्वा दुःखेन रामो ऽपि लक्ष्मणेन समन्वितः ॥ हत्वा वने मृगं तत्र मांसखण्डान्समन्ततः ॥ ३८ ॥

रघूत्तम, अहं (पू.) दृष्ट्वा मुक्तः [ स्यां ]; राम, पुनः मां ( मू. ) यास्यामि. ' ॥ ३५ ॥ स्मयन् रामः (पू.) पस्पर्श. ॥ ततः जटायुः (मू.) पतितः.॥३६॥साश्रुलोचनः रामः(पू.)शोचित्वा॥ (मू.) समानाय्य तं प्रददाह. ॥ ३७ ॥ लक्ष्मणेन समन्वितः रामः अपि दुःखेन स्नात्वा तत्र वने मृगं (मू.) ॥ ३८ ॥ ॥ ९४ ॥

१ विस्मय करणारा. २ हातानें. ३ अनु बद्दल. ४ आणवून. ५ जाळिता झाला. ६ स्नान करून. ७ मांसाच्या तुकड्यांना.

हिरव्यागार गवतानें आच्छादिलेल्या प्रदेशावर अनेक जागीं पसरून टाकिले, व 'सर्व पक्ष्यांनीं हे तुकडे भक्षण करावे, ह्यांच्या योगें पक्षिराज (जटायु) तृप्त होवो,' ॥३९॥ असा संकल्प केला. नंतर राम जटायूला ह्मणाला :– 'जटायो ! आतां माझ्या पदास जा. ह्या लोकांच्या समक्ष तुला माझी सरूपता मुक्ति मिळो.'॥४०॥ इतक्यांत लागलेंच त्या पुण्यवान् जटायूला दिव्य स्वरूप प्राप्त झालें. तो सूर्याप्रमाणें तेजस्वी अशा उत्तम विमानांत चढून बसला. ॥ ४१ ॥ शंख, चक्र, गदा, पद्म, किरीट, अलंकार ह्यांच्या योगानें आणि स्वतांच्या प्रकाशानें त्यानें आकाशाला शोभा आणिली. त्यानें पीतांबर परिधान केला होता; त्याची मूर्ति निर्मल

शाद्वले प्राक्षिपद्रामः पृथक् पृथगनेकधा ॥ भक्षन्तु पक्षिणः सर्वे तृप्तो भवतु पक्षिराट् ॥ ३९ ॥ इत्युक्त्वा राघवः प्राह जटायो गच्छ मत्पदम् ॥ मत्सारूप्यं भजस्वाद्य सर्वलोकस्य पश्यतः ॥ ४० ॥ ततोऽनंतरमेवासौ दिव्यरूपधरः शुभः ॥ विमानवरमारुह्य भास्वरं भानुसन्निभम् ॥ ४१ ॥ शंखचक्रगदापद्मकिरीटवरभूषणैः ॥ द्योतयन्स्वप्रकाशेन पीताम्बरधरोऽमलः ॥ ४२ ॥

रामः (पू.) प्राक्षिपत्. ॥ 'सर्वे पक्षिणः (मू.) तृप्तः भवतु,' ॥ ३९ ॥ (पू.) गच्छ; अद्य सर्वलोकस्य पश्यतः [सतः] (मू.). ॥ ४० ॥ (पू.) असौ ॥ (मू.) विमानवरं आरुह्य ॥ ४१ ॥ (पू.) ॥ [उपलक्षितः] (मू.) स्वप्रकाशेन द्योतयन् [आसीत्]. ॥ ४२ ॥

१ हिरव्या गवताच्या कुरणांत. २ फेंकिता झाला. ३ होवो. ४ तेजस्वी. ५ सूर्यासारख्या. ६ स्वतांच्या कांतीनें.

जटायु रामाची स्तुति करितो.

होती; ॥ ४२ ॥ तशाच स्वरूपांचे चार विष्णूचे पार्षद त्याची चोंहांकडून पूजा करीत होते; योगिजनांचे समुदाय स्तुतिपाठ गात होते; अशा स्थितींत त्यानें रामाला संबोधन देऊन सत्वर हांक मारिली, आणि हात जोडून त्या रघुनंदनाची स्तुति केली :– ती येणेंप्रमाणें :– ॥ ४३ ॥ जटायु ह्मणाला :– 'मी परमात्मरूपी रामचंद्राला सतत वंदन करितों. - त्या प्रभूच्या शक्ति अनंत असल्यामुळें - गुण असंख्य आहेत; त्याला देशकालांची इयत्ता नाहीं; तो पुराण पुरुष होय; सगळ्या जगाचें पालन, संहार आणि उत्पत्ति ह्यांचें कारण तोच आहे; शांति हीच त्याच्या रूपाची उत्तम शोभा होय. ॥ ४४ ॥

चतुर्भिः पार्षदैर्विष्णोस्तादृशैरभिपूजितः ॥ स्तूयमानो योगिगणै राममाभाष्य सत्वरः ॥ कृताञ्जलिपुटो भूत्वा तुष्टाव रघुनन्दनम् ॥ ४३ ॥ जटायुरुवाच । अगणितगुणमप्रमेयमाद्यं सकलजगत्स्थितिसंयमादिहेतुम् ॥ उपरमपरमं परात्मभूतं सततमहं प्रणतो ऽस्मि रामचन्द्रम् ॥ ४४ ॥

तादृशैः विष्णोः ( पू. ) ॥ योगिगणैः स्तूयमानः सत्वरः [ सः ] ( मू. ) रामं आभाष्य तुष्टाव – ॥ ४३ ॥ ज० उ० – ' अहं (मू.) सततं प्रणतः अस्मि. ॥ ४४ ॥

---

१ स्तविला जाणारा. २ संबोधन देऊन. ३ स्तुति करूं लागला. ४ ज्याच्या गुणांना संख्या नाहीं, अशा. ५ ज्याला इयत्ता नाहीं, अशा. ६ सगळ्या जगाचें पालन संहार इत्यादि करणाऱ्या. ७ शांतीनें शोभा ज्याला अशा.

त्याचें स्वरूप अनंत सुखमय आहे; त्याच्यावर लक्ष्मी आपले प्रेमकटाक्ष सतत फेंकीत असते; त्यानें देवेंद्र, ब्रह्मदेव इत्यादिकांचीं दुःखें दूर केलीं; तो मनुष्यांतील श्रेष्ठ प्रभु - भक्तांना - वर देण्यास उत्सुक असतो, व हस्तामध्यें धनुष्य बाण धारण करितो; अशा त्या रामचंद्राला मी निरंतर प्रणाम करितों. ॥ ४५ ॥ त्याचें स्वरूप सगळ्या त्रैलोक्यांत अति सुंदर आहे; स्तुति करण्याचा योग्य विषय तोच होय; त्याची कांति शेंकडों सूर्यांप्रमाणें आहे; भक्तांच्या इच्छा पूर्ण करणें त्याचा स्वभावच होय; तो आश्रयदाता प्रभु, प्रीतीचें आदिस्थान जें अंतःकरण, त्यांत वास करितो; मी त्या रघुनंदनाला शरण आलों आहें. ॥ ४६ ॥ त्याचें नाम संसाररूपी अरण्याला जाळून टाकणारा दवाग्नि ( वणवा ) होय; शंकर आदिकरून देवांनाही तो पूज्य

नि[1]रवधिसुखमिन्दिरा[2]कटाक्षं क्षपि[3]तसुरेन्द्रचतुर्मुखादिदुःखम् ॥ न[4]रवरम[5]निशं नतो
ऽस्मि रामं वरदमहं वरचाप[6]बाणहस्तम् ॥ ४५ ॥ त्रि[7]भुवनकमनीयरूपमी[8]ड्यं
र[9]विशतभासुरमी[10]हितंप्रदानम् ॥ श[11]रणदमनिशं सु[12]रागमूले कृतनि[13]लयं रघुनन्दनं
प्रपद्ये ॥४६॥ भ[14]वविपिनदवाग्निनामधेयं भ[15]वमुखदैवतदैवतं दयालुम् ॥

अहं ( मू. ) रामं नतः अस्मि. ॥ ४५ ॥ ४६ ॥ ( पू. ) ॥

---

१ अत्यंत सुखरूपी. २ लक्ष्मीचे कटाक्ष ज्याच्यावर, अशा. ३ नाहींशीं केलीं इंद्र, ब्रह्मदेव इत्यादिकांचीं दुःखें ज्यानें, अशा. ४ मनुष्यश्रेष्ठास. ५ नित्य. ६ उत्तम धनुष्य व बाण हातीं ज्याच्या, अशा. ७ त्रैलोक्यांत मनोहर रूप ज्याचें, अशा. ८ स्तुति करण्याचा योग्य विषय. ९ शेंकडों सूर्यांप्रमाणें तेजस्वी. १० इच्छित देणाऱ्या. ११ आश्रय देणाऱ्या. १२ उत्तम प्रीतीच्या आश्रयभूत (चित्तांत). १३ वास करणाऱ्या. १४ संसाररूप अरण्याला दावाग्नि (वणवा) आहे नाम ज्याचें, अशा.१५ शंकर प्रभृति देवांचें दैवत.

आहे; तो परम दयालु ईश्वर सहस्रावधि अथवा कोट्यवधि दैत्यांचा नाश करण्यासाठीं - अवतार घेत असतो; - त्याची अंगकांति सूर्याच्या कन्ये( यमुनानदी )सारखी आहे. त्या दुःखहर्त्या ईश्वराला मी शरण आलों. ॥ ४७ ॥ तो प्रभु निरंतर संसाराच्या चिंतनांत गढलेल्या जनांना दूर आहे ( प्राप्त होत नाहीं ); संसारापासून पराङ्मुख झालेल्या मुनींना त्याचें दर्शन नित्य मिळतें; त्याचे चरण हे संसारसमुद्र सहज तरून जाण्याचें साधन नौका होत; अशा त्या रघुकुमाराला मी शरण आलों आहें. ॥ ४८ ॥ तो परमात्मा शंकर आणि पार्वती ह्या उभयतांच्या हृदयांत वास करितो; तोच - कृष्णावतार घेऊन - गोवर्धननामक मोठ्या पर्वताला उचलून धरील. मोठमोठे देव आणि दैत्यांचे अधिपति त्याच्या चरणांची सेवा करितात; तो देवांना

[1]दनुजपतिसहस्रकोटिनाशं [2]रवितनयासदृशं हरिं प्रपद्ये ॥ ४७ ॥ [3]अविरतभवभाव-
नातिदूरं [4]भवविमुखैर्मुनिभिः सदैव दृश्यम् ॥ [5]भवजलधिसुतारणाङ्घ्रिपोतं शरण-
महं रघुनन्दनं प्रपद्ये ॥४८॥ [6]गिरिशगिरिसुतामनोनिवासं [7]गिरिवरधारिणमीहि-
[8]ताभिरामम् ॥ [9]सुरवरदनुजेन्द्रसेविताङ्घ्रिं [10]सुरवरदं रघुनायकं प्रपद्ये ॥ ४९ ॥

(मू.). ॥ ४७ ॥ अहं (मू.) शरणं प्रपद्ये. ॥ ४८ ॥ ४९ ॥

१ मोठमोठे हजारों कोटि दैत्य मारणाऱ्या. २ सूर्याची कन्या जी यमुना तिच्यासारख्या (कृष्णवर्ण). ३ ज्यांना नित्य संसाराचा ध्यास, त्या जनांना दूर असणाऱ्या. ४ संसाराला पराङ्मुख. ५ संसारसमुद्र सुखानें तरून जाण्यास साधन नौका चरण ज्याचे अशा. ६ शंकर आणि पार्वती ह्यांच्या मनांत राहणाऱ्या. ७ मोठा पर्वत धरणाऱ्या. ८ चरित्रांच्या योगानें मनोहर. ९ मोठे देव व महान् महान् दैत्य ह्यांनीं सेविले चरण ज्याचे, अशा. १० देवांना वर देणाऱ्या.

हांतीं माझी सरूपता मुक्ति मिळेल.' ॥ ५५ ॥ रामचंद्राचें हें भाषण ऐकिल्यावर त्यावेळीं जटायुपक्ष्याचें अंतःकरण आनंदानें भरून गेलें. त्याला रामचंद्रासारखें रूप प्राप्त झालें होतेंच. आतां तो अत्युत्तम पदवीला गेला. - त्या पदाची थोरवी किती वर्णावी :- ब्रह्मदेव देखील त्या स्थानाची पूजा करितो. ॥ ५६ ॥

इति अध्यात्मरामायणार्थबोधे अरण्यकाण्डे अष्टमः सर्गः ॥ ८ ॥

नंतर, रामचंद्र लक्ष्मणाला बरोबर घेऊन दुसऱ्या अरण्यांत गेला, व तेथें पुन्हां दुःखाचा आविर्भाव आणून तत्परतेनें सीतेचा शोध करूं लागला. ॥ १ ॥ त्याठिकाणीं एक राक्षस त्या दोघांच्या दृष्टीस पडला. त्याची आकृति विलक्षण होती; त्याला छातीवरच एक मोठें थोरलें तोंड असून डोळे वगैरे कांहीं एक नव्हते.

स याति मम सारूप्यं मरणे मत्स्मृतिं लभेत् ॥५५॥ इति राघवभाषितं तदा श्रुतवान् हर्ष[1]समाकुलो द्विजः ॥ रघुनन्दनसाम्यमास्थितः स प्रययौ [2]ब्रह्मसुपूजितं पदम् ॥५६॥ इति श्रीमद० रामा० उ० अरण्यका० अष्टमः सर्गः ॥ ८ ॥ ततो रामो लक्ष्मणेन जगाम विपिना[3]न्तरम्॥ पुनर्दुःखं समाश्रित्य सीतान्वेषणतत्परः॥१॥ तत्राद्[6]भुतसमाकारो राक्षसः प्रत्यदृश्यत ॥ वक्षस्येव महाव[7]क्त्रश्चक्[8]षुरादिविवर्जितः ॥२॥

(मू.)याति, मरणे मत्स्मृतिं लभेत्.'॥५५॥(मू.) प्रययौ.॥५६॥ इति श्रीमदध्यात्मरामायणान्वये अरण्यकाण्डे अष्टमः सर्गः ॥८॥ (पू.) जगाम, ॥ ( मू. ) [ बभूव ]. ॥ १ ॥ ( मू. ) राक्षसः प्रत्यदृश्यत.॥२॥

---

१ हर्षानें व्याप्त. २ ब्रह्मदेवानें उत्तम पूजिलेल्या. ३ दुसऱ्या अरण्यांत. ४ गेला. ५ सीतेचा शोध करण्यांत तत्पर. ६ चमत्कारिक आकार ज्याचा, असा. ७ मोठें तोंड ज्याचें, असा. ८ डोळे इत्यादिकांनीं रहित. ९ दिसला.

॥ २ ॥ त्या राक्षसाचे हात चार कोसपर्यंत हालचाल करीत होते; सर्व प्राण्यांचा प्राण घेणाऱ्या त्या महादैत्याचें नांव कबंध. ॥ ३ ॥ रामलक्ष्मण त्याच्या बाहूंमधील प्रदेशांत फिरत होते : भोंवतीं बाहूंचा वेढा पडला, तेव्हां एकाएकीं त्यांची दृष्टि त्या प्रचंड प्राण्यावर गेली. ॥ ४ ॥ तेव्हां राम हांसत हांसत लक्ष्मणाला ह्मणाला :–' लक्ष्मणा! अरे हा पहा राक्षस ! ह्याला डोकें व पाय नसून, छातीवर तोंड आहे ! ॥५॥ हातामध्यें जें जें कांहीं सांपडेल तें तें खाऊन हा निर्वाह करितो, असें मला निःसंशय वाटतें. खरोखर !

बाहू [1]योजनमात्रेण [2]व्यापृतौ तस्य रक्षसः ॥ कबन्धो नाम दैत्येन्द्रः सर्वसत्त्वविहिंसकः ॥ ३ ॥ तद्बाह्वोर्मध्यदेशे तौ चरन्तौ रामलक्ष्मणौ ॥ [4]ददर्शतुर्[3]महासत्त्वं तद्बाहुपरिवेष्टितौ ॥ ४ ॥ रामः प्रोवाच विहसन्पश्य लक्ष्मण राक्षसम् ॥ [5]शिरःपादविहीनोऽयं यस्य [6]वक्षसि चा[7]ननम् ॥ ५ ॥ बाहुभ्यां [8]लभ्यते यद्यत्तत्तद्भक्षन् स्थितो ध्रुवम् ॥ आवामप्येतयोर्बाह्वोर्मध्ये संकलितौ ध्रुवम् ॥ ६ ॥

तस्य रक्षसः ( पू. ). ॥ [ सः ] ( मू. ) [ आसीत् ]. ॥ ३ ॥ ( मू. ) तौ रामलक्ष्मणौ महासत्त्वं ददृशतुः ॥ ४ ॥ विहसन् ( पू. ) पश्य; ॥ ( मू. ) [ अस्ति ] ! ॥ ५ ॥ यत् यत् ( पू. ) स्थितः ! ॥ ( मू. ) [9]संकलितौ. ॥ ६ ॥

---

१ चार कोसपर्यंत. २ चळवळ करणारे. ३ मोठ्या प्राण्याला. ४ पाहते झाले. ५ डोकें, आणि पाय ह्यांनीं रहित. ६ छातीवर. ७ मुख. ८ मिळतें. ९ वेढिलेले.

इच्छित वर देतो; अशा त्या रघुनायकाला मी शरण प्राप्त झालों. ॥ ४९ ॥ जे जन परद्रव्य आणि परस्त्री वर्ज्य करितात, दुसऱ्याचे गुण आणि ऐश्वर्यें पाहून ज्यांच्या मनांला संतोष वाटतो, तसेंच ज्यांचीं अंतःकरणें दुसऱ्याचें हित करण्याचे कामीं सदा तत्पर असतात, त्यांना ह्या कमलनयन रघुवीराची सेवा सुसाध्य आहे; मी त्या ईश्वराला शरणागत आहें. ॥ ५० ॥ त्याचें मुखकमल किंचित् हास्याच्या योगानें सुंदर व प्रफुल्ल दिसतें; मला त्याची प्राप्ति फार सुलभ रीतीनें झाली; त्याची अंगकांति इंद्रनील रत्नाप्रमाणें नीलवर्ण आहे; त्याच्या नेत्रांची शोभा शुभ्र कमलाप्रमाणें रमणीय वाटते; तो रघुपति शंकराच्या गुरूचा (पित्याचा, ब्रह्मदेवाचा) गुरु (पिता) होय; मी त्याला शरण आलों. ॥ ५१ ॥ रामचंद्रा, सूर्य ज्याप्रमाणें उदकानें भरलेल्या अनेक पात्रांत प्रतिबिंबित झाला ह्मणजे अनेकरूपी दिसतो, त्या-

[1]परधनपरदारवर्जितानां [2]परगुणभूतिषु [3]तुष्टमानसानाम् ॥ [4]परहितनिरतात्मनां सु-
सेव्यं रघुवरमम्बुजलोचनं प्रपद्ये ॥ ५० ॥ [5]स्मितरुचिरविकासिताननाब्जमति-
सुलभं [6]सुरराजनीलनीलम् ॥ [7]सितजलरुहचारुनेत्रशोभं रघुपतिमीशगुरोर्गुरुं
प्रपद्ये ॥५१॥ [8]हरिकमलजशंभुरूपभेदात्त्वमिह विभासि [9]गुणत्रयानुवृत्तः ॥

(मू.) रघुवरं प्रपद्ये.॥५०॥(मू.)रघुपतिं प्रपद्ये. ॥५१॥ जलपूरितोदपात्रेषु रविः इव त्वं इह(पू.)भासि.॥

---

१ दुसऱ्याचें द्रव्य व परस्त्री वर्ज करणाऱ्या. २ दुसऱ्यांचे गुण व ऐश्वर्य ह्यांच्या ठिकाणीं. ३ संतुष्ट मन ज्यांचें, अशा. ४ दुसऱ्याच्या हितास तत्पर मन ज्यांचें अशा. ५ हास्यानें सुंदर व प्रफुल्ल मुखकमल ज्याचें, अशा. ६ इंद्रनीळ मण्याप्रमाणें नीळवर्ण. ७ शुभ्र कमलाप्रमाणें सुंदर नेत्रांची शोभा ज्याची, अशा. ८ विष्णु, ब्रह्मदेव, शंकर ह्या रूपांच्या भेदांनीं. ९ तीन गुणांनीं युक्त.

प्रमाणें तूं सत्त्व, रज, तम ह्या तीन गुणांच्या अनुरोधानें वागत असलास कीं ह्या जगांत विष्णु, ब्रह्मदेव आणि शंकर अशा भेदांनीं विविध भासत असतोस; देवेंद्रानें केलेल्या स्तुतीचा विषय तूंच होस. मी तुझा स्तव करितों. ॥ ९२ ॥ रामचंद्राची मूर्ति शेंकडों कोटि मदनांप्रमाणें सुंदर आहे. शतपथ ब्राह्मणांत सांगितल्याप्रमाणें भावना ठेविली कीं त्याची प्राप्ति होणें दुर्घट नाहीं. महान् महान् योग्यांच्या अंतरीं तो नित्य प्रकाशत असतो. भक्तांचीं दुःखें दूर करणाऱ्या त्या प्रभु रघुवीराला मी शरणागत आहें.' ॥९३॥ जटायूनें अशी स्तुति चालविली असतां रघुपति प्रसन्न झाला व त्याला ह्मणाला :— ‘तुझें कल्याण असो. मी विष्णुरूपी आहें. तूं माझ्या उच्च पदवीला प्राप्त हो. ॥ ९४ ॥ जो मनुष्य, तूं केलेलें हें स्तोत्र नियमानें ऐकेल, लिहील, किंवा वाचींत जाईल, त्याला मरणसमयीं माझें स्मरण होईल, आणि दे-

रविरिव जलपूरितोदपात्रे[1]ष्वमरपति[2]स्तुतिपात्रमीशमीडे ॥५२॥ रतिपतिशतको[3]टिसुन्दरांगं शतपथगोचरभावनाविदूरम्[4] ॥ यतिपति[5]हृदये सदा विभातं[6] रघुपतिमार्तिहरं[7] प्रभुं प्रपद्ये ॥५३॥ इत्येवं स्तुवतस्तस्य प्रसन्नोऽभूद्रघूत्तमः ॥ उवाच गच्छ भद्रं ते मम विष्णोः परं पदम् ॥ ५४ ॥ शृणोति य इदं स्तोत्रं लिखेद्वा नियतः पठेत् ॥

(मू.)॥९२॥९३॥' (पू.) प्रसन्नः अभूत्. [रामः] उवाच–‘ते भद्रं. (मू.) गच्छ. ॥९४॥यः इदं स्तोत्रं(पू.),॥

१ उदकानें भरलेल्या भांड्यांत. २ देवेंद्राच्या स्तुतीला विषय. ३ शंभर कोटि मदनांप्रमाणें सुंदर. ४ शतपथ ब्राह्मणांत सांगितल्याप्रमाणें भावना केली असतां लांब नसलेल्या ( प्राप्त होणाऱ्या ). ५ महान् महान् योग्यांच्या हृदयांत. ६ भासलेल्या. ७ पीडा हरण करणाऱ्या.

आपण दोघेही ह्याच्या बाहूंमध्यें सांपडलों आहों ! ॥ ६ ॥ रघुनंदना ( लक्ष्मणा ) ! बाहेर निघून जाऊं ह्मटलें तर दुसरा कोठें मार्ग दिसत नाहीं. आतां येथें आपण करावें काय? हा तर आपल्याला खाणार ! ' ॥ ७ ॥ लक्ष्मणानें त्याला उत्तर दिलें :– ' रामा ! ह्यांत विचार तो काय करायाचा ? आपण दोघेही, न घाबरतां, ह्या राक्षसाचा एक एक हात तोडूं ह्मणजे झालें ! ' ॥ ८ ॥ रामानें ' बरें आहे ' असें ह्मणून खड्गाच्या योगानें राक्षसाचा उजवा हात तोडिला. लक्ष्मणानेंही तसाच त्याचा डावा भुज सहज तोडून टाकिला. ॥ ९ ॥ तेव्हां त्या दैत्याला फार आश्चर्य वाटलें. - त्यानें ह्या दोघांना विचारिलें :– ' अहो ! तुह्मी आहां कोण? - मला वाटतें - तुह्मी कोणी तरी श्रेष्ठ देव आहां; नाहीं तर माझे हात तोडण्याची, ह्या लोकांत

गन्तुमन्यत्र मार्गो न दृश्यते रघुनन्दन ॥ किं कर्तव्यमितोऽस्माभिरिदानीं भक्षयेत्स नौ ॥७॥ लक्ष्मणस्तमुवाचेदं किं विचारेण राघव ॥ आवामेकैकमव्यग्रौ छिन्द्यां रक्षोभुजौ ध्रुवम् ॥ ८ ॥ तथेति रामः खड्गेन भुजं दक्षिणमच्छिनत् ॥ तथैव लक्ष्मणो वामं चिच्छेद भुजमञ्जसा ॥ ९ ॥ ततोऽतिविस्मितो दैत्यः कौ युवां सुरपुंगवौ ॥ मद्बाहुच्छेदकौ लोके दिवि देवेषु वा कुतः ॥ १० ॥

रघुनन्दन, (पू.) ! ॥ इतः अस्माभिः ( मू. ) भक्षयेद ! ॥ ७ ॥ ( पू. ) उवाच – ' राघव, विचारेण किं ? ॥ अव्यग्रौ आवां ( मू. ) छिन्द्यावः. ' ॥ ८ ॥ ( पू. ) भुजं अच्छिनत्. ॥ ( मू. ) चिच्छेद. ॥ ९ ॥ (पू.) [ उवाच ] ' सुरपुंगवौ युवां कौ ? ॥ ( मू. ) ! ' ॥ १० ॥

१ आपल्याला. २ न भ्यालेले. ३ आपण दोघे. ४ राक्षसाच्या हातांना.५ तोडूं. ६ तोडिता झाला.७डाव्या. ८ सहज.९ देवश्रेष्ठ.

'मी राम तूं
कोण?'

काय आणि स्वर्गी देवांमध्यें काय, शक्ति आहे कोणाला?' ॥ १० ॥ पुढें कमलनयन रामचंद्रानें किंचित् हास्य करीत त्याला सांगितलें :– 'राक्षसा, दशरथराजा ह्मणून एक ऐश्वर्यवान् व बलाढ्य असा अयोध्येचा अधिपति होऊन गेला. ॥ ११ ॥ मी त्याचा मुलगा राम. हा बुद्धिमान् पुरुष माझा भाऊ लक्ष्मण. माझी भार्या त्रैलोक्यांत सुंदर अशी जनकाची कन्या सीता ह्मणून आहे. ॥ १२ ॥ आह्मी मृगयेसाठीं बाहेर गेलों होतों. इतक्यांत सीतेला कोणी तरी राक्षसानें नेलें. तिचा शोध करीत आह्मी ह्या घोर अरण्यांत आलों; ॥ १३ ॥ पण येथें तुझ्या बाहूंच्या वेढ्यांत सांपडलों. ह्मणून प्राणांचें रक्षण करण्यासाठीं आह्मांला तुझे भुज तोडावे लागले. - बरें, आतां आह्मांला एवढें सांग कीं - असें हें भयंकर रूप धारण करणारा तूं आहेस तरी

ततो ऽब्रवीद्धसन्नेव रामो राजीवलोचनः ॥ अयोध्याधिपतिः श्रीमान् राजा दशरथो महान् ॥११॥ रामो ऽहं तस्य पुत्रो ऽसौ भ्राता मे लक्ष्मणः सुधीः ॥ मम भार्या जनकजा सीता त्रैलोक्यसुन्दरी ॥१२॥ आवां मृगयया यातौ तदा केनापि रक्षसा ॥ नीतां सीतां विचिन्वन्तौ[1] चागतौ घोरकानने[2] ॥१३॥ बाहुभ्यां वेष्टितावत्र तव प्राणरिरक्षया ॥ छिन्नौ तव भुजौ त्वं च को वा विकटरूपधृक्[3]॥१४॥

(पू.) रामः अब्रवीत् – '(मू.). ॥ ११ ॥ तस्य पुत्रः (पू.) लक्ष्मणः मे भ्राता. (मू.) सीता मम भार्या. ॥ १२ ॥ (मू.) आगतौ. ॥ १३ ॥ अत्र तव बाहुभ्यां वेष्टितौ; (पू.) तव भुजौ छिन्नौ. (मू.) त्वं कः वा?' ॥ १४ ॥

१ शोधणारे. २ भयाण अरण्यांत. ३ विक्राळ रूप धरणारा.

कोण ? ' ॥ १४ ॥ कबंध ह्मणाला :– " रामा ! ज्याअर्थी तूं माझ्या सन्निध प्राप्त झालास, त्या अर्थी मी धन्य झालों. मी पूर्वी गंधर्वांचा राजा होतों. उत्तम रूप आणि तारुण्याचा भर प्राप्त झाल्यामुळें गर्वाविष्ट होऊन ॥ १५ ॥ मी सगळ्या जगांत फिरत असें. माझ्याकडे पाहिल्याबरोबर उत्तम उत्तम स्त्रियांचीं मनें मोहून जात. रामा ! मी तप करून ब्रह्मदेवापासून अमरपट्टा मिळविला. ॥ १६ ॥ पुढें एकदां अष्टावक्र मुनींची भेट झाली असतां मला त्यांच्या ( त्या आठ ठिकाणीं वांकड्या ) शरीराकडे पाहून हांसू आलें. ( मीं त्यांची थट्टा उडविली ). त्यामुळें मुनींला क्रोध आला व त्यांनीं मला शाप दिला कीं, 'दुष्टा ! दुर्बुद्धे ! तूं राक्षस होशील ! ' ॥ १७ ॥ तपाच्या प्रभावानें अष्टावक्र मुनींची कांति जिकडे तिकडे फांकली होती. मी

कबन्ध उवाच॥ धन्यो ऽहं यदि राम त्वमागतो ऽसि ममान्तिकम् ॥ पुरा गन्धर्वराजो ऽहं रूपयौवनदर्पितः ॥१५॥ विचरँल्लोकमखिलं वरनारीमनोहरः ॥ तपसा ब्रह्मणो लब्धमवध्यत्वं रघूत्तम ॥ १६ ॥ अष्टावक्रं मुनिं दृष्ट्वा कदाचिदहसं पुरा ॥ क्रुद्धो ऽसावाह दुष्ट त्वं राक्षसो भव दुर्मते ॥ १७ ॥ अष्टावक्रः पुनः प्राह वन्दितो मे दयापरः ॥ शापस्यान्तं च मे प्राह तपसा द्योतितप्रभः ॥१८॥

क० उ० – " ( पू. ) आगतः असि, [ तर्हि ] अहं धन्यः. ॥ ( १५ उ. १६ पू. ) अखिलं लोकं विचरन् अहं रूपयौवनदर्पितः [अभवम्]. ॥ रघूत्तम, (मू.) लब्धं. ॥ १५ ॥ १६ ॥ (पू.) अहसम्.(मू.) त्वं राक्षसः भव. ॥ १७ ॥ मे वंदितः दयापरः (पू.). ॥ तपसा द्योतितप्रभः [ सः ] (मू). – ॥१८॥

१ रूप आणि तारुण्य यांच्यायोगानें गर्वित.२ सुंदर स्त्रियांचें मन हरणारा.३ मरण नसणें.४ हांसलों.५ चमकली कांति ज्याची असा.

पायां पडलों; तेव्हां दयावंत होऊन त्यांनीं पुन्हां मला शापाचा अंत सांगून दिला :— ते ह्मणाले:— ॥ १८ ॥ ' त्रेतायुगामध्यें साक्षात् नारायण दशरथाचा पुत्र होऊन येईल, व तुझे चार कोस लांब पसरलेले दोन्ही हात तोडील; ॥ १९ ॥ तेव्हां तूं शापापासून मुक्त होत्साता पूर्व रूप पावशील.' अशा प्रकारें त्यांनीं शाप दिला असतां, मला, स्वतांचें शरीर राक्षसासारखें झालें आहे, असें दिसून आलें! ॥ २० ॥ रामा, पुढें एके प्रसंगीं मी क्रोधानें देवेंद्राच्या आंगावर धांवून गेलों. तेव्हां त्यानेंही माझ्या मस्तकावर वज्राच्या योगें प्रहार केला. ॥ २१ ॥ रघुकुमारा, तत्काल माझें मस्तक खालीं उदरांत शिरलें व पाय मुळींच नष्ट झाले! ब्रह्मदेवानें वर दिला होता, ह्मणून वज्रप्रहार लागला तरी मला मृत्यु आला नाहीं. ॥ २२ ॥

त्रेतायुगे दाशरथिर्भूत्वा नारायणः स्वयम् ॥ आगमिष्यति ते बाहू छिद्येते योजनायतौ[1] ॥१९॥ तेन शापाद्विनिर्मुक्तो भविष्यसि यथा पुरा ॥ इति शप्तो ऽहमद्राक्षं[2] राक्षसीं तनुमात्मनः ॥२०॥ कदाचिद्देवराजानमभ्यद्रवमहं[4] रुषा[3] ॥ सो ऽपि वज्रेण मां राम शिरोदेशे ऽभ्यताडयत्[5] ॥ २१ ॥ तदा शिरो[6] गतं कुक्षिं[7] पादौ च रघुनन्दन ॥ ब्रह्मदत्तवरान्मृत्युर्नाभून्मे वज्रताडनात् ॥ २२ ॥

' नारायणः, ( १९ मू. ). तेन [ यदा ] योजनायतौ ते बाहू छिद्येते, [ तदा ] ( २० पू. ) भविष्यसि.' ॥ ( बा. मू. ) राक्षसीं तनुं अद्राक्षम् ! ॥ १९ ॥ २० ॥ राम, अहं रुषा (मू.). ॥ २१ ॥ रघुनन्दन, (पू.) गतं; पादौ च [ गतौ ]. ॥ (मू.) मृत्युः न अभूत्. ॥ २२ ॥

१ योजनाइतके लांब. २ पाहतां झालों ३ क्रोधानें. ४ आंगावर धांवलों. ५ प्रहार करिता झाला. ६ मस्तक. ७ पोटांत.

माझें मुख नाहींसें झालें, असें पाहून सर्व लोकांचीं मनें दयेनें कळवळलीं, ते देवेंद्राला ह्मणाले कीं, 'हा मुखावांचून जगेल तरी कसा?' ॥२३॥ तेव्हां इंद्र मला ह्मणाला, 'तुला उदरावर मुख फुटेल; आणि तुझे हात योजनाइतके लांब होतील. आतां येथून जा.' ॥२४॥ त्यानें असें सांगितलें असतां मी येथें येऊन राहिलों. माझा नित्य निर्वाह वनामध्यें जें जें कांहीं हातांला लागे, त्याच्या भक्षणावर चालत असे. पण, हे पुण्यपुरुषा, सांप्रत तूं ते माझे बाहु तोडून टाकिलेस! ॥ २५ ॥ - आतां माझी तुजजवळ प्रार्थना एवढीच आहे कीं, - तूं मला एखाद्या अग्नि आणि काष्ठें ह्यांनीं भरलेल्या खाड्याच्या तोंडीं टाकून दे. हे रघुकुलो-

मुखाभावे कथं जीवेदयमित्यमराधिपम् ॥ ऊचुः सर्वे दयाविष्टा मां विलोक्या-
स्यवर्जितम् ॥२३॥ ततो मां प्राह मघवा जठरे ते मुखं भवेत् ॥ बाहू ते योजन-
नायामौ भविष्यत इतो व्रज ॥ २४॥ इत्युक्तो ऽत्र वसन्नित्यं बाहुभ्यां वनगोच-
रान् ॥ भक्षयाम्यधुना बाहू खण्डितौ मे त्वया ऽनघ ॥ २५ ॥ इतः परं मां
श्वभ्रास्ये निक्षिपाग्नीन्धनावृते ॥ अग्निना दह्यमानो ऽहं त्वया रघुकुलोत्तम ॥२६॥

सर्वे मां आस्यवर्जितं विलोक्य दयाविष्टाः[संतः]अयं (मू.) ॥२३॥ ततः मघवा (पू.); ते (मू.).॥२४॥ अनघ, (मू.) त्वया मे बाहू खंडितौ.॥२५॥(पू.)श्वभ्रास्ये निक्षिप. ॥ रघुकुलोत्तम, त्वया(मू.).॥२६॥

१ मुखरहित. २ जीवेत् वांचेल. ३ इंद्र. ४ उदरावर. ५ योजनाइतके लांब. ६ जा. ७ वनांत सांपडणाऱ्या. ८ अग्नींधनावृते अग्नि आणि काष्ठें ह्यांनीं भरलेल्या. ९ खाड्याच्या तोंडीं. १० टाक. ११ जळणारा.

कबंध रामाची
स्तुति करितो.

त्तमा ! तूं अग्नीच्या योगें जाळिलेंस ह्मणजे ॥ २६ ॥ मला पूर्वरूप प्राप्त होईल. आणि मग मी तुझ्या पत्नीचा मार्ग तुला सांगून देईन. ' त्यानें असें सांगितलें असतां रामानें तत्क्षणीं लक्ष्मणाकडून एक खाडा तयार करविला, त्यामध्यें त्या राक्षसाला ॥ २७ ॥ ठेवून काष्ठांच्या योगानें दहन केलें. लागलाच त्या राक्षसाच्या शरीरापासून एक मदनासारखा सुंदर व सर्व अलंकारांनीं भूषित असा पुरुष उत्पन्न झाला. ॥ २८ ॥ त्यानें रामाला प्रदक्षिणा घातली, साष्टांग नमस्कार केला व हात जोडून भक्तीमुळें सद्गदित झालेल्या वाणीनें असें म्हटलें : — ॥ २९ ॥ गंधर्व ह्मणाला : — ' रामा, आज माझें मन तुझी स्तुति करण्यासाठीं फार त्वरेनें ( उत्सुकतेनें ) उचल करीतें आहे. तुझ्या स्वरूपाला देशाच्या योगें इयत्ता नाहीं ( तूं अमुक प्रदेशांत

पूर्वरूपमनुप्राप्य भार्यामार्गं वदामि ते ॥ इत्युक्ते लक्ष्मणेनाशु श्वभ्रं निर्माय तत्र तम् ॥२७॥ निक्षिप्य प्रादहत्काष्ठैस्ततो देहात्समुत्थितः ॥ कन्दर्पसदृशाकारः सर्वाभरणभूषितः ॥ २८ ॥ रामं प्रदक्षिणं कृत्वा साष्टांगं प्रणिपत्य च ॥ कृताञ्जलिरुवाचेदं भक्तिगद्गदया गिरा ॥२९॥ गंधर्व उवाच । स्तोतुमुत्सहते मे ऽद्य मनो रामातिसंभ्रमात् ॥ त्वामनन्तमनाद्यन्तं मनोवाचामगोचरम् ॥ ३० ॥

( पू. ) भार्यामार्गं वदामि. " ॥ ( मू. ) ॥ २७ ॥ निक्षिप्य काष्ठैः (मू.) [ पुरुषः ] ॥ २८ ॥ (मू.) इदं उवाच — ॥ २९ ॥ ' राम, अद्य ( मू. ) त्वां स्तोतुं उत्सहते. ॥ ३० ॥

१ पावून. २ पत्नीच्या मार्गाला. ३ खाड्याला. ४ निर्माण करून. ५ ठेवून. ६ जाळता झाला. ७ उठलेला. ८ मदनासारखें रूप ज्याचें, असा. ९ स्तुति करण्यास. १० उचल करितें.

मात्र असतोस, असें नाहीं; तर सर्वत्र आहेस ). तसें तुला आदि किंवा अंत नाहीं ( तुला कालाच्या योगें मर्यादा नाहीं ह्मणजे तूं अनादि कालापासून आहेस व तुझा अंत कधींही व्हावयाचा नाहीं ). मनाला तुज-बद्दल तर्क करण्याची शक्ति नाहीं व वाणीला तुझें वर्णन करितां येत नाहीं. ॥ ३० ॥ तुझें सूक्ष्म रूप - विराट् आणि हिरण्यगर्भ ह्या नांवांच्या स्थूल सूक्ष्म अशा - दोन्ही देहांहून वेगळें व ज्ञानमय असल्यामुळें योग्यांना देखील समजण्यास कठीण आहे. तुझ्यावांचून इतर सर्व दृश्य पदार्थ अनात्मक अर्थात जड होत. प्रभो, मन हें जड कोटींतच असल्यामुळें तुजहून भिन्न आहे; त्याला तुझें ज्ञान व्हावें कसें ? ॥ ३१ ॥ बुद्धि आणि आत्म्याचें प्रतिबिंब ह्यांच्या ऐक्याला जीव असें ह्मटलें आहे. बुध्यादि जड पदार्थांचें साक्षिभूत ब्रह्मच होय. अशा त्या तुझ्या रूपीं मन आणि वाणी ह्यांचा प्रवेश होत नाहीं. त्याच्या ठिकाणीं सर्व प्रपंचाचा ॥ ३२ ॥ आरोप अज्ञानामुळें लोक करितात. वस्तुतः तें निर्विकार

सूक्ष्मं ते रूपमव्यक्तं देहद्वयविलक्षणम् ॥ दृग्रूपमितरत्सर्वं दृश्यं जडमनात्मकम् ॥ तत्क-थं त्वां विजानीयाद्व्यतिरिक्तं मनः प्रभो ॥ ३१ ॥ बुद्ध्यात्माभासयोरैक्यं जीव इत्यभि-धीयते ॥ बुद्ध्यादिसाक्षी ब्रह्मैव तस्मिन्निर्विषये ऽखिलम् ॥ ३२ ॥ आरोप्यते ऽज्ञानव-शान्निर्विकारे ऽखिलात्मनि ॥ हिरण्यगर्भस्ते सूक्ष्मं देहं स्थूलं विराट् स्मृतम् ॥ ३३ ॥

देहद्वयविलक्षणं दृग्रूपं ( पू. द्वि. मू. ); ॥ प्रभो, तत् व्यतिरिक्तं मनः त्वां ( मू. ) ? ॥ ३१ ॥ ( ३२ मू. ॥ बा. ३३ पू. ) [त्वयि] अज्ञानवशात् अखिलं [जगत्] आरोप्यते. ॥ (मू.). ॥३२॥३३॥

१ दोन्ही शरीरांवेगळें. २ ज्ञानरूप. ३ वेगळें. ४ जाणील. ५ बुद्धि आणि आत्म्याचें प्रतिबिंब ह्यांचें. ६ ह्मटलें जातें. ७ आरोपिलें जातें.

व सर्वांचा आत्मा होय. हिरण्यगर्भ हें तुझें सूक्ष्म शरीर, व विराट् स्थूल देह असें ह्मटलें आहे. ॥ ३३ ॥ तुझें सूक्ष्मरूप - हृदयकमलामध्यें - ध्यान करण्याचा विषय होय. त्याचें ध्यान केलें असतां ध्यान करणारांचें कल्याण होतें; ह्मणजे ह्याचें ध्यान सिद्ध झालें असतां प्राण्याला भूत, भविष्य व वर्तमान अशा जगांतील यावत् गोष्टींचें ज्ञान होतें. ॥ ३४ ॥ अंडगोल हा तुझा स्थूल देह होय. त्याच्या भोंवतीं एकापेक्षां एक अधिक अशीं महत्तत्त्वादिकांचीं * सात आवरणें आहेत. त्यांत असलेला विराट्जीव हा धारणेचा आश्रय होय. ॥ ३५ ॥ सर्व जनांनीं अंतीं प्राप्त करून घेण्याजोगी वस्तु कायतो तूंच होस. चतुर्दश भुवनें तुझे अव-

[2]भावनाविषयो राम सूक्ष्मं ते ध्यातृमंगलम् ॥ [3]भूतं [4]भव्यं [5]भविष्यच्च यत्रेदं दृश्य-
ते जगत् ॥३४॥ स्थूलेऽण्डकोशे देहे ते महदादिभिरावृते ॥ सप्तभिरुत्तरै[6]र्गुणैर्वै-
[7]राजो [8]धारणाश्रयः ॥ ३५ ॥ त्वमेव सर्व[9]कैवल्यं लोकास्ते ऽवयवाः स्मृताः ॥
पातालं ते [10]पादमूलं पार्ष्णिस्तव महातलम् ॥ ३६ ॥

राम, [1]ध्यातृमंगलं ते सूक्ष्मं [ रूपं ] (पू.) ॥ यत्र ( मू. ) दृश्यते. ॥ ३४ ॥ सप्तभिः उत्तरगुणैः (पू.) अण्डकोशे ते स्थूले देहे ( मू. ). ॥ ३५ ॥ ( मू. ); ॥ ३६ ॥

---

१ ध्यान करणारांना हितावह. २ ध्यानाचा विषय. ३ पूर्वीं झालेलें. ४ सध्यां होत असणारें. ५ पुढें होणारें. ६ उत्तरोत्तर द-सपटींनें अधिक. ७ विराट् पुरुष. ८ ध्यानाचा आधार. ९ अंतीं मिळविण्याचें. १० तळवे. * ( १ ) महत्तत्त्व, ( २ ) अहंकार, ( ३ ) आकाश, ( ४ ) वायु, ( ५ ) अग्नि, (६) उदक, (७) पृथ्वी हीं सात आवरणें होत. हीं, पहिल्यापेक्षां दुसरें दसपटीनें मोठें, दुसऱ्यापेक्षां तिसरें दसपटीनें अधिक, अशा क्रमानें उत्तरोत्तर मोठालीं आहेत.

यव असें ह्मटलें आहे : – पाताल लोक तुझा तळपाय; महातल तुझी खोंट; ॥ ३६ ॥ रसातल तुझे घोंटे; व तलातल तुझ्या पोटऱ्या, असें ह्मटलें आहे; रामा, सुतल लोक तुझे गुडघे, तसाच वितल मांड्या होत; ॥ ३७ ॥ रामचंद्रा, अतल हा तुझा मांड्यांचा वरचा सांधा, आणि पृथ्वी तुझा कटिभाग होय; स्वर्गलोक तुझें वक्षःस्थल व महर्लोक तुझा कंठभाग आहे; ॥ ३८ ॥ जनलोक हें तुझें मुख; आणि तपोलोक तुझा शंखाकार ललाट होय; प्रभो रघुवीरा, सत्यलोक तुझ्या मस्तकीं सदासर्वकाळ राहत असतो; ॥ ३९ ॥ रामा, इन्द्रादि लोकपाल तुझे बाहु; दिशा कान; अश्विनीकुमार नासिका, आणि अग्नि तुझें मुख, असें ह्मणतात; ॥ ४० ॥ रामचंद्रा, सूर्य तुझे नेत्र, व चंद्र मन असें ह्मटलें आहे; तुझ्या भ्रुकुटींची वक्रता हाच काल

रसातलं ते गुल्फौ[१] तु तलातलमितीर्यते[२] ॥ जानुनी[३] सुतलं राम ऊरू[४] ते वितलं तथा ॥ ३७ ॥ अतलं च मही राम जघनं नाभिगं नभः ॥ उरःस्थलं ते ज्योतींषि[५] ग्रीवा ते मह उच्यते ॥ ३८ ॥ वदनं[७] जनलोकस्ते तपस्ते शंखदेशगम्[८] ॥ सत्यलोको रघुश्रेष्ठ शीर्षण्यास्ते[९] सदा प्रभो ॥ ३९ ॥ इन्द्रादयो लोकपाला बाहवस्ते दिशः श्रुती[११] ॥ अश्विनौ[१२] नासिके[१३] राम वक्त्रं[१४] ते ऽग्निरुदाहृतः ॥ ४० ॥ चक्षुस्ते सविता[१५] राम मनश्चन्द्र उदाहृतः ॥

(पू.)[जंघे]इति ईर्यते; राम, ते(मू.)॥३७॥अतलं च[ते ऊर्वोरूर्ध्वं जघनाधोभागः];राम,(पू.);॥ते(मू.); ते ग्रीवा[६] महः उच्यते;॥३८॥रघुश्रेष्ठ प्रभो, ते(मू.)आस्ते[१०];॥३९॥राम, ते(मू.)वक्त्रं अग्निः उदाहृतः;॥४०॥(पू.)

१ घोंटे. २ ईर्यते ह्मटलें जातें. ३ गुडघे. ४ मांड्या. ५ नक्षत्रें. ६ मान. ७ मुखभाग. ८ शंखासारख्या ललाटीं असलेलें. ९ शीर्षणि मस्तकीं. १० आहे. ११ कान. १२ अश्विनीकुमार. १३ नाकपुड्या. १४ मुख. १५ सूर्य.

( मृत्यु ); व तुझी बुद्धि बृहस्पति होय; ॥ ४१ ॥ रुद्र तुझा अहंकाररूप आहे; हे निर्विकारस्वरूपा, तुझें भाषण वेद होत; यम तुझ्या दाढांवर राहिला आहे; तुझ्या दंतपंक्ति नक्षत्रें आहेत; ॥ ४२ ॥ तुझें हास्य ही जगाला मोह घालणारी माया होय; तुझे कटाक्षपात ही सृष्टि; तुझा पुढचा भाग धर्म, आणि पृष्ठभाग अ-धर्म, असें ह्मटलें आहे; ॥ ४३ ॥ रघुवीरा, तुझ्या नेत्रांच्या पापण्या मिटणें आणि उघडणें हेच रात्र आणि दिवस होत; सात समुद्र तुझें उदर; आणि, प्रभो, नद्या तुझ्या नाड्या आहेत; ॥ ४४ ॥ ईश्वरा, तुझ्या शरीरावरील लव हे वृक्षवनस्पति; तुझें रेत ह्मणजे वृष्टि; आणि ज्ञानशक्ति हा तुझा महिमा ( सर्वांपेक्षां श्रे-

भ्रूभंग एव कालस्ते बुद्धिस्ते वाक्पतिर्भवेत् ॥ ४१ ॥ रुद्रोऽहंकाररूपस्ते वाच-
श्छन्दांसि ते ऽव्यय ॥ यमस्ते दंष्ट्रदेशस्थो नक्षत्राणि द्विजालयः ॥ ४२ ॥ हासो
मोहकरी माया सृष्टिस्ते ऽपांगमोक्षणम् ॥ धर्मः पुरस्ते ऽधर्मश्च पृष्ठभाग उदी-
रितः ॥४३॥ निमिषोन्मेषणे रात्रिर्दिवा चैव रघूत्तम ॥ समुद्राः सप्त ते कुक्षिर्ना-
ड्यो नद्यस्तव प्रभो ॥ ४४ ॥ रोमाणि वृक्षौषधयो रेतो वृष्टिस्तव प्रभो ॥

ते (मू.) बुद्धिः वाक्पतिः भवेत्; ॥ ४१ ॥ अव्यय, रुद्रः ते (पू.) वाचः ॥ (मू.); ॥ ४२ ॥ ते (पू.) सृष्टिः; ॥ धर्मः ते (मू.). ॥४३॥ रघूत्तम, (पू.); ॥ प्रभो, सप्त (मू.) नाड्यः;॥४४॥प्रभो, तव(पू.); ॥

१ बृहस्पति. २ भाषणें. ३ वेद. ४ दाढेवर राहणारा. ५ दंतपंक्ति. ६ कटाक्ष फेंकणें. ७ डोळ्यांची झांप व उघड. ८ दिवस. ९ उदर. १० केंस. ११ वृक्ष व औषधि.

षपणा) ; तुझें स्थूल (विराट्) शरीर हें अशा प्रकारचें आहे. ॥४५॥ मनुष्यांनीं ह्या तुझ्या स्थूल रूपीं आपलें मन स्थिर केलें; ह्मणजे त्यांना आयासावांचून मोक्ष प्राप्त होतो. ह्यावांचून दुसरें सुलभ मोक्षप्राप्तीचें उत्तम साधन कांहीं नाहीं. ॥ ४६ ॥ ह्मणून, रामा, मी तुझ्या स्थूल रूपाचेंच ध्यान करितों; त्याचें चिंतन केलें असतां मनुष्याच्या अंतःकरणीं प्रेमरस उद्भवतो; खऱ्या प्रेमरसाचें लक्षण हें आहे कीं, आश्रयाचें स्मरण झाल्याबरोबर मनुष्याच्या आंगावर रोमांच उभे राहतात : तशी स्थिति तुझ्या विराट् स्वरूपाचें ध्यान करणाराची होते. ॥४७॥ रामा, जीव तुझ्या स्थूल रूपाचें ध्यान करूं लागला कीं त्याला मुक्ति मिळालीच, असें समजावें. स्थूलरूपाचें चिंतन तर असोच; पण रघुवीरा, मी सांप्रत अग्रभागीं दिसत असलेल्या ह्या तुझ्या स्वरूपाचेंच ध्यान करितों. ॥४८॥ ह्याच्या हस्तांत धनुष्यबाण धरिलेले आहेत; अंगकांति श्यामवर्ण असून, जटा आणि वल्कलें ह्यांच्या योगानें

महिमा[1] ज्ञानशक्तिस्ते एवं स्थूलं वपुस्तव ॥ ४५ ॥ यदस्मिन् स्थूलरूपे ते मनः सन्धार्यते[2] नरैः ॥ अनायासेन मुक्तिः स्यादतो ऽन्यन्न हि किंचन ॥ ४६ ॥ अतो ऽहं राम रूपं ते स्थूलमेवानुभावये[3] ॥ यस्मिन्ध्याते प्रेमरसः सरोमपुलको[4] भवेत् ॥४७॥ तदैव मुक्तिः स्याद्राम यदा ते स्थूलभावकः ॥ तदप्यास्तां तवैवाहमेतद्रूपं विचिन्तये[5] ॥ ४८ ॥ धनुर्बाणधरं श्यामं जटावल्कलभूषितम् ॥

ते(मू.)वपुः॥४५॥यत् नरैः ते(पू.)[तर्हि] (मू). ॥ ४६ ॥ राम, (पू.) रूपं अनुभावये; ॥ (मू.) प्रेमरसः भवेत्. ॥४७॥ राम, यदा [जीवः] ते स्थूलभावकः, (मू.)तव एतत् एव रूपं विचिंतये.॥४८॥ (पू.) ॥

१ मोठेपण. २ लाविलें जातें. ३ ध्यान करितों. ४ रोमांचांसह. ५ ध्यान करितों.

नाम मंत्राचें माहात्म्य.

त्याला शोभा आली आहे; ही मूर्ति आपल्या मनोहर तारुण्य वयांत असून लक्ष्मणासहवर्तमान सीतेचा शोध करीत आहे. ॥४९॥ रघुनंदना, हेंच रूप माझ्या अंतःकरणीं सतत वास करो. भगवान् शंकर ह्मणजे सर्वज्ञ; पण तो देखील पार्वतीसह सर्वकाळ ॥ ५० ॥ ह्या तुझ्या स्वरूपाचेंच निर्वेधपणें ध्यान करीत असतो; रघुवीरा, तुझें नाम - जीवांना अज्ञानसमुद्रांतून - तारणारें आहे; - तें 'तत्त्वमसि' इत्यादि महावाक्यांनीं प्रतिपादिलेल्या - ब्रह्मरूप अर्थाचें वर्णन करितें; भगवान् शंकर नित्य आपलें अंतःकरण संतुष्ट ठेवून काशीक्षेत्रामध्यें मरणोन्मुख झालेल्या जीवांना त्या तुझ्या 'राम, राम' अशा नाममंत्राचा नेहमीं उपदेश करीत असतो. ह्यावरून, हे सीतापते, तूं परमेश्वर आहेस, असें पूर्णपणें सिद्ध आहे. ॥ ५१ ॥ ५२ ॥ हे सर्व जन तुझ्या मायेनें

अपीच्यवयसं[1] सीतां विचिन्वन्तं सलक्ष्मणम् ॥ ४९ ॥ इदमेव सदा मे स्यान्मानसे रघुनन्दन ॥ सर्वज्ञः शंकरः साक्षात्पार्वत्या सहितः सदा ॥५०॥ त्वद्रूपमेवं सततं ध्यायन्नास्ते रघूत्तम ॥ मुमूर्षूणां सदा काश्यां तारकं[2] ब्रह्मवाचकम् ॥ ॥ ५१ ॥ रामरामेत्युपदिशन्सदा सन्तुष्टमानसः ॥ अतस्त्वं जानकीनाथ परमात्मा सुनिश्चितः ॥ ५२ ॥ सर्वे ते मायया मूढास्त्वां न जानन्ति तत्त्वतः ॥ नमस्ते रामभद्राय वेधसे परमात्मने ॥ ५३ ॥

(मू.) ॥४९॥ (पू.) स्यात्. रघुनन्दन, ॥ (मू.) साक्षात् शंकरः सदा ॥५०॥ मुमूर्षूणां तारकं ब्रह्मवाचकं एवं त्वद्रूपं संततं ध्यायन् सदा काश्यां आस्ते, रघूत्तम, ॥ ५१ ॥ ( पू. ) [ तिष्ठति ] जानकीनाथ, ( मू. ). ॥ ५२ ॥ ( पू. ) न जानन्ति. ॥ ( मू. ) ते नमः. ॥ ५३ ॥

१ सुंदर वयांत ( तारुण्यांत ) असणाऱ्या. २ तारणाऱ्या.

॥ ६४ ॥

मोहून गेले आहेत; ह्मणून ह्यांना तुझ्या यथार्थस्वरूपाचें ज्ञान होत नाहीं. हे रामचंद्रा, हे मंगलदायका, हे सृष्टिकर्त्या, परमेश्वरा, तुला नमस्कार असो. ॥५३॥ हे अयोध्याधीश्वरा, तुला नमस्कार असो. लक्ष्मण तुझी सतत सेवा करीत आहे. हे जगन्नाथा, माझें रक्षण कर. मला संसारांतून तार. तुझ्या मायेनें मला मोह घालूं नये." ॥५४॥ रामचंद्र ह्मणालाः– 'हे देवगंधर्वा, तूं पुण्यवान् आहेस. तुझ्या भक्तीनें आणि स्तुतीच्या योगानें मीं संतुष्ट झालों. आतां तूं चिरकालपर्यंत राहणाऱ्या माझ्या परम पदरूपी स्वर्गास जा. योगी पुरुष आपल्या योगसामर्थ्यानें ह्या देहासह त्या लोकीं जाऊं शकतात. ॥ ५५ ॥ तूं आतां माझी जी स्तुति केलीस, ही वेदप्रतिप्रादित अर्थाला अनुलक्षून आहे. जे जन अनन्य भावानें भक्तिपुरःसर ह्या स्तोत्राचा जप करितील, ते अज्ञानापासून उद्भवणाऱ्या प्रपंचाचा निरास करून माझ्या स्वरूपास पावतील. माझें स्वरूप नित्य व अनुभवगम्य आहे.' ॥ ५६ ॥ इतिश्रीमदध्यात्मरामायणार्थबोधे अरण्यकांडे नवमःसर्गः ॥ ९ ॥

अयोध्याधिपते तुभ्यं नमः सौमित्रिसेवित ॥ त्राहि त्राहि जगन्नाथ मां माया नावृणोतु ते ॥५४॥ राम उवाच ॥ तुष्टोऽहं देवगन्धर्व भक्त्या स्तुत्या च तेऽनघ ॥ याहि मे परमं स्थानं योगिगम्यं[1] सनातनम्[2] ॥५५॥ जपन्ति ये नित्यमनन्यबुद्ध्या भक्त्या त्वदुक्तं स्तवमागमोक्तम् ॥ तेऽज्ञानसंभूतभवं[3] विहाय[4] मां यान्ति नित्यानुभवानुमेयम्[5] ॥ ५६ ॥
इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अरण्यकाण्डे नवमः सर्गः ॥ ९ ॥

(पू.)तुभ्यं नमः ॥ (मू.) ते माया मां न आवृणोतु.' ॥५४॥ रा०उ०–'अनघ देवगंधर्व, अहं ते (पू.) तुष्टः॥(मू.)मे परमं स्थानं याहि.॥५५॥(पू.)त्वदुक्तं स्तवं जपंति,॥(मू.)मां यान्ति.'॥५६॥इति नवमः सर्गः

१ योग्यांना समजणारें. २ नित्य. ३ अज्ञानामुळें उद्भवणाऱ्या संसारास. ४ टाकून. ५ नित्य अनुभवानें कळून येणाऱ्या.

ते शबरीकडे आले.

अशा प्रकारें वर मिळाला असतां, तो गंधर्व जावयास निघाला, व जातां जातां रामाला ह्मणाला :–' रघुनंदना, तो पुढें - दिसत आहे, - त्या आश्रमांत एक शबरी ( भिल्लीण ) राहत असते ॥ १ ॥ ती भक्तिमार्गांत निष्णात असून तुझ्या चरणकमलावर परम प्रेम करिते. हे महाभाग्यशाली पुरुषा, तिजकडे जा; ह्मणजे ती तुला - सीतेबद्दल - वृत्तांत सर्व सांगेल. ' ॥ २ ॥ असें सांगून तो गंधर्व सूर्यासारख्या तेजस्वी विमानाच्या योगें विष्णुपदास ( स्वर्गास ) गेला. ( शंकर ह्मणतात :– पार्वति ! ) रामनामाचें स्मरण केलें असतां असें फल प्राप्त होतें. - असो. - ॥३॥ - कबंधाच्या अरण्यामध्यें - सिंह व्याघ्र इत्यादि पशूंचा फार उपद्रव होता. रामचंद्र तें भयाण अरण्य मागें टाकून हळूहळू शबरीच्या आश्रमस्थलीं येऊन पोंचला. ॥ ४ ॥ लक्ष्मणासहवर्तमान रामचंद्र येत आहे, असें दुरूनच शबरीच्या दृष्टीस पडलें. लागलीच ती आनंदानें उठून सामोरी

लब्ध्वा वरं स गंधर्वः प्रयास्यन् राममब्रवीत् ॥ शबर्यास्ते[2] पुरोभागे आश्रमे रघुनन्दन ॥ ॥१॥ भक्त्या त्वत्पादकमले भक्तिमार्गविशारदा[3] ॥ तां प्रयाहि महाभाग सर्वं ते कथयिष्यति ॥२॥ इत्युक्त्वा प्रययौ सोऽपि विमानेनार्कवर्चसा[6] ॥ विष्णोः पदं रामनामस्मरणे फलमीदृशम् ॥३॥ त्यक्त्वा तद्विपिनं घोरं सिंहव्याघ्रादिदूषितम् ॥ शनैरथाश्रमपदं शबर्या रघुनन्दनः ॥ ४ ॥ शबरी राममालोक्य लक्ष्मणेन समन्वितम् ॥

सः गंधर्वः वरं (पू.) – ॥ 'रघुनन्दन, ( बा. १ उ. २ पू. ) शबरी आस्ते, ॥ तां प्रयाहि; [सा] भक्त्या (मू.).' ॥१॥२॥ (पू.) विमानेन विष्णोः पदं प्रययौ. (मू.) फलं. ॥ ३ ॥ रघुनन्दनः (पू.) तत् विपिनं त्यक्त्वा ( मू. ) आश्रमपदं [ ययौ. ] ॥ ४ ॥ सा शबरी ( पू. ) रामं आरात् आयान्तं आलोक्य

१ जाणारा. २ भिल्लीण. ३ भक्तिमार्गांत निष्णात. ४ जा. ५ सांगेल. ६ सूर्यासारख्या तेजस्वी. ७ जवळ. ८ येणाऱ्या. ९ पाहून.

आली ॥ ५ ॥ व चरणांपुढें लोटांगण घालून उभी राहिली. तिचे नेत्र आनंदाश्रूंनीं भरून आले. तिनें स्वागतप्रश्न करून उभयतांचा सत्कार केला, त्यांना उत्तम आसनांवर बसविलें, ॥ ६ ॥ व भक्तिपूर्वक उत्तम प्रकारें रामलक्ष्मणांचे पाय धुवून त्या उदकाच्या योगें आपल्या शरीरावर सिंचन केलें. नंतर शबरीनें मोठ्या आदरानें अर्घ्यादि उपचारांसहित पूजाद्रव्यांनीं लक्ष्मणासह रामाची यथाविधि पूजा केली, व रामासाठीं संग्रह करून ठेविलेलीं अमृततुल्य फळें आनंदानें भक्तिपूर्वक त्याला अर्पण केलीं, आणि विलेपनासह सुगंधिक पुष्पांच्या योगें - पुन्हां - त्याच्या चरणांची पूजा केली. ॥ ७ ॥ ॥ ८ ॥ ॥ ९ ॥

आयान्तमाराद्धर्षेण प्रत्युत्थायाचिरेण[1] सा ॥५॥ पतित्वा पादयोरग्रे हर्षपूर्णाश्रुलोचना ॥ स्वागतेनाभिनन्द्याथ[2] स्वासने संन्यवेशयत्[3] ॥६॥ रामलक्ष्मणयोः सम्यक्पादौ प्रक्षाल्य भक्तितः ॥ तज्जलेनाभिषिच्यांगमथार्घ्यादिभिरादृता ॥७॥ संपूज्य विधिवद्रामं ससौमित्रिं सपर्यया[4] ॥ संगृहीतानि दिद्यानि[5] रामार्थं शबरी मुदा ॥८॥ फलान्यमृतकल्पानि[6] ददौ रामाय भक्तितः ॥ पादौ संपूज्य कुसुमैः सुगन्धैः सानुलेपनैः[7] ॥ ९ ॥

अचिरेण (बा. मू.), ॥ ५ ॥ पादयोः अग्रे ( पू. ) ॥ [ सती ] (मू.). ॥ ६ ॥ आदृता [ सा ] शबरी ( पू. ) सम्यक् प्रक्षाल्य, ॥ अङ्गं (मू.) ॥ ७ ॥ ससौमित्रि रामं (पू.) संपूज्य, ॥ शबरी रामार्थं मुदा (मू.) ॥८॥ अमृतकल्पानि ( ९ पू.) ददौ. ॥ भक्तिसंपन्ना शबरी (बा.९उ.) कुसुमैः पादौ सम्पूज्य ॥

१ तत्क्षणीं. २ अभिनन्द्य सत्कार करून. ३ बसविती झाली. ४ पूजेनें. ५ देण्याजोग्या. ६ अमृतासारख्या. ७ उटीसहित, अशा.

आतिथ्य झाल्यावर कनिष्ठ बंधूसह रामचंद्र स्वस्थ बसला असतां, महाभक्त शबरीनें हात जोडून त्याच्याशीं भाषण करण्यास प्रारंभ केला :- ती ह्मणाली :- ॥ १० ॥ " रघुवीरा, ह्या आश्रमामध्यें माझे गुरु महर्षि राहत असत. मीही आज पुष्कळ सहस्र वर्षें त्यांची सेवा करीत त्यांच्या सन्निध राहत असें. सांप्रत ते ब्रह्मपदीं गेले. जातांना त्यांनीं मला असें सांगितलें कीं, ' तूं स्वस्थ अंतःकरणेंकरून येथेंच राहा. ॥११॥१२॥ साक्षात् सनातन परब्रह्म परमात्मा राक्षसांचा वध आणि ऋषींचें रक्षण करण्यासाठीं दशरथाचा पुत्र राम झाला आहे. ॥ १३ ॥ तो येथें लवकरच येईल. तूं - इतर विषयांकडे लक्ष न देतां - एकनिष्ठपणें त्याचें ध्यान करीत स्वस्थ ऐस. सध्यां प्रभु चित्रकूटपर्वतावरील आश्रमांत राहत आहे. ॥ १४ ॥

**कृतातिथ्यं रघुश्रेष्ठमुपविष्टं सहानुजम् ॥ शबरी भक्तिसंपन्ना प्राञ्जलिर्वाक्यमब्रवीत् ॥ ॥१०॥ अत्राश्रमे रघुश्रेष्ठ गुरवो मे महर्षयः ॥ स्थिताः शुश्रूषणं तेषां कुर्वती समुपस्थिता ॥११॥ बहुवर्षसहस्राणि गतास्ते ब्रह्मणः पदम् ॥ गमिष्यन्तोऽब्रुवन्मां त्वं वसात्रैव समाहिता ॥१२॥ रामो दाशरथिर्जातः परमात्मा सनातनः ॥ राक्षसानां वधार्थाय ऋषीणां रक्षणाय च ॥१३॥ आगमिष्यति चैकाग्रध्याननिष्ठा स्थिरा भव ॥ इदानीं चित्रकूटाद्रावाश्रमे वसति प्रभुः ॥१४॥**

(बा.१०पू.) रघुश्रेष्ठं (मू.)-॥९॥१०॥"रघुश्रेष्ठ, अत्र आश्रमे मे (११पू.) ॥ स्थिताः तेषां(११उ.) अहं बहुवर्षसहस्राणि समुपस्थिता. ॥ (१२पू.) गताः. ॥ ते गमिष्यन्तः[सन्तः]मां अब्रुवन्-'(मू.)वसे.॥११॥ ॥१२॥ सनातनः परमात्मा (मू.) दाशरथिः रामः जातः; ॥१३॥ [सः] (पू. ). ॥ प्रभुः(मू.). ॥१४॥

१ सेवा. २ जवळ राहिलेली. ३ जायाला निघालेले. ४ समाधानयुक्त, अशी. ५ राहा.

ते। येईपर्यंत तूं आपल्या शरीराचें संरक्षण कर. रामाचें दर्शन झाल्यावर स्वतांचें शरीर दग्ध करून तूं त्याच्या पदास जाशील.' ॥१५॥ रामा, मी त्यांच्या आज्ञेप्रमाणें वागत आल्यें – ह्मणजे केवळ तुझें ध्यान करण्यांत तत्पर असत्यें. आजपर्यंत तुझी वाट पाहिली. आज गुरूंचें वचन फलद्रूप झालें. ॥ १६ ॥ रामचंद्रा, तुझें दर्शन माझ्या गुरूंना देखील झालें नाहीं; आणि मी केवळ मूढ व हीन जातींत उत्पन्न झालेली स्त्री असून मला झालें, - हें केवढें तरी माझें भाग्य ! - खरोखर, तुझें रूप अप्रमेय आहे. ॥ १७ ॥ तुझ्या दासाच्या दासाची किंवा अशी ( दासाचा दास, त्याचा दास, पुन्हां त्याचा दास अशी ) परंपरा शंभर पर्यंत अथवा

यावदागमनं तस्य तावद्रक्ष कलेवरम् ॥ दृष्ट्वैव राघवं दग्ध्वा देहं यास्यसि तत्पदम् ॥१५॥ तथैवाकरवं राम त्वद्ध्यानैकपरायणा ॥ प्रतीक्ष्यागमनं तेऽद्य सफलं गुरुभाषितम् ॥१६॥ तव संदर्शनं राम गुरूणामपि मे न हि ॥ योषिन्मूढाऽप्रमेयात्मन् हीनजातिसमुद्भवा ॥ १७ ॥ तव दासस्य दासानां शतसंख्योत्तरस्य वा ॥ दासीत्वे नाधिकारोऽस्ति कुतः साक्षात्तवैव हि ॥ १८ ॥

तस्य (पू.) रक्ष. ॥ राघवं दृष्ट्वा एव देहं दग्ध्वा तत्पदं यास्यसि.' ॥ १५ ॥ ( बा. पू. ) [ अहं ] ते आगमनं प्रतीक्ष्य तथा एव अकरवं (मू.) सफलं. ॥ १६ ॥ राम, ( पू. ) गुरूणां अपि न ! ॥ अप्रमेयात्मन, [ अहं ] (मू.) योषित् [ अस्मि ]. ॥ १७ ॥ [ मम ] (पू.) दासस्य ॥ ( मू. ) न अस्ति; साक्षात् तव एव [ दासीत्वे ] कुतः ? ॥ १८ ॥

१ शरीराला. २ जाळून. ३ जाशील. ४ करिती झाल्यें. ५ वाट पाहून. ६ इयत्ता नाहीं स्वरूपाला ज्याच्या, अशा. ७ नीच जातींत जन्मास आलेली. ८ बायको. ९ दासाचा दास, पुन्हां त्याचा दास अशा परंपरेनें शंभरापेक्षां पुढल्या.

पुढेंही लागत गेली तरी त्या दासाची देखील सेवा करण्याचा मला अधिकार नाहीं; मग प्रत्यक्ष तुझी सेवा करण्याची योग्यता कोठून असेल? ॥ १८ ॥ रामा, तुझें स्वरूप मनाला समजण्यासारखें किंवा वाणीनें वर्णन करण्याजोगें नाहीं. असें असून, तूं आज मला दिसलास कसा? हे देवाधिदेवा! तुझी स्तुति कशी करावी, तें मला समजत नाहीं. काय करूं? मजवर अनुग्रह कर." ॥ १९ ॥ राम ह्मणाला :– "शबरि! पुरुष, स्त्री, किंवा जाति, नांवें, आश्रम वगैरे विशेष, हीं कांहीं माझी सेवा करण्याचीं साधनें नव्हत. भक्ति हेंच मुख्य साधन होय. ॥ २० ॥ लोकांनीं पुष्कळ यज्ञ, दानें, तपश्चर्या, वेदाध्ययन व इतर कर्में केलीं, पण जर ते माझी भक्ति करण्यास पराङ्मुख असतील, तर त्यांना माझें दर्शन मिळणें शक्य नाहीं. ॥ २१ ॥ बाई, ह्मणून मी तुला भक्तीचीं साधनें संक्षेपांत सांगतों :– साधूंचा समागम धरणें हें पहिलें (मुख्य) साधन होय; ॥ २२ ॥ दुसरें, माझ्या कथा वाचणें; तिसरें, माझ्या गुणांचें कीर्तन करणें; चवथें, माझें प्रतिपादन

कथं रामाद्य मे दृष्टस्त्वं मनोवागगोचरः ॥ स्तोतुं न जाने देवेश किं करोमि प्रसीद[1] मे ॥ ॥१९॥ श्रीराम उवाच ॥ पुंस्त्वे स्त्रीत्वे विशेषो वा जातिनामाश्रमादयः ॥ न कारणं मद्भजने भक्तिरेव हि कारणम् ॥२०॥ यज्ञदानतपोभिर्वा वेदाध्ययनकर्मभिः ॥ नैव द्रष्टुमहं शक्यो मद्भक्तिविमुखैः सदा ॥२१ तस्माद्भामिनि[2] संक्षेपाद्वक्ष्ये ऽहं भक्तिसाधनम् ॥ सतां संगतिरेवात्र साधनं प्रथमं स्मृतम् ॥ २२॥ द्वितीयं मत्कथालापस्[3]तृतीयं मद्गुणेरणम्[4] ॥

(पू.) त्वं मे कथं दृष्टः? ॥ देवेश, (मू.) प्रसीद. " ॥१९॥ श्रीरा० उ० – '(पू.) ॥ मद्भजने कारणं (मू.). ॥२०॥ सदा मद्भक्तिविमुखैः अहं (मू.). ॥२१॥ (पू.) संक्षेपात् वक्ष्ये – ॥ (मू.) ॥२२॥ (पू.)॥

१ प्रसन्न हो. २ बाई. ३ माझ्या कथांचें वर्णन. ४ माझे गुण गाणें.

करणाऱ्या उपनिषद्वाक्यांचें व्याख्यान करणें, हें साधन आहे; ॥ २३ ॥ हे शुभे, गुरूची ‘हा राम आहे,’ अशा बुद्धीनें निष्कपटपणें नित्य सेवा करणें, हें पांचवें साधन; पुण्य आचरणाची रुचि धरणें. - चोरी वर्ज्य करणें, ब्रह्मचर्य, कसलाही संग्रह न करणें - हे नियम पाळणें, - आसन, प्राणायाम प्रत्याहार, शुद्धता, संतोष, तप, स्वाध्याय, हे - नियम धरणें धारणा, ध्यान, समाधि करणें, ॥ २४ ॥ आणि माझी पूजा करण्यावर निष्ठा ठेवणें हें सहावें साधन ह्मटलें आहे; मंत्रकल्पांमध्यें सांगितलेल्या विधी-प्रमाणें माझ्या मंत्राची सांग उपासना करणें हें सातवें अंग ह्मणतात; ॥ २५ ॥ मजपेक्षांही माझ्या भक्तांची अधिक पूजा करणें, प्राणिमात्रांच्या ठिकाणीं ‘हीं रामरूप आहेत’ असा भाव ठेवणें, बाह्य विषयांविषयीं वैराग्य, आणि मनाचा व बाह्य इंद्रियांचा निग्रह, ॥ २६ ॥ हें आठवें साधन; आणि माझ्या तत्त्वस्वरूपाचा विचार करणें, हें नववें साधन; शबरि ! असे भक्तीचे नऊ प्रकार आहेत. ह्यांचें साधन जो कोणी

[2]व्याख्यातृत्वं मद्वचसां चतुर्थं साधनं भवेत् ॥ २३ ॥ आचार्योपासनं भद्रे [3]मद्बुद्ध्या [4]ऽमायया सदा ॥ पञ्चमं पुण्यशीलत्वं यमादि नियमादि च ॥ २४ ॥ निष्ठा मत्पूजने नित्यं षष्ठं साधनमीरितम् ॥ मम मन्त्रोपासकत्वं सांगं सप्तममुच्यते ॥ २५ ॥ मद्भक्तेष्वधिका पूजा सर्वभूतेषु मन्मतिः ॥ [6]बाह्यार्थेषु वि[7]रागित्वं शमादिसहितं तथा ॥ २६ ॥ अष्टमं नवमं तत्त्वविचारो मम भामिनि ॥ एवं नवविधा भक्तिः साधनं यस्य कस्य वा ॥ २७ ॥

मद्वचसां (मू.). ॥२३॥ (पू.) आचार्योपासनं ॥ (मू.)॥२४॥मत्पूजने नित्यं (पू.)॥ सांगं (मू.); ॥२५॥ (पू.) ॥ तथा शमादिसहितं (मू.)॥२६॥(पू.) भामिनि, मम तत्त्वविचारः नवमं ॥ (मू.). साधनं.॥२७॥

१माझ्या भाषणांचें. २व्याख्यान करणें. ३राम अशा बुद्धीनें. ४निष्कपटपणें. ५ गुरूची सेवा करणें. ६लौकिक उपभोगांविषयीं. ७वैराग्य.

'तूं मुक्त होशीलच.'

करील, – ॥ २७ ॥ मग ती स्त्री असो, पुरुष असो, किंवा पशुपक्षी असो, – त्याची मजवर भक्ति जडते. हे सुलक्षणसंपन्न स्त्रिये ! शुद्ध प्रेम हेंच भक्तीचें लक्षण होय. ॥ २८ ॥ भक्ति उत्पन्न झाली कीं तत्काल माझ्या तत्त्वाचा साक्षात्कार होतो; व माझ्या स्वरूपाचा अनुभव सिद्ध झाला असतां लागलीच प्राण्याला त्या जन्मांतच मुक्ति ॥ २९ ॥ मिळते. ह्यावरून मोक्षाचें कारण भक्ति हें पूर्णपणें ठरतें. ज्याला पहिलें एक साधन सिद्ध झालें, त्याला क्रमानें ॥३०॥ सर्व साध्य होतें. ह्यावरून भक्ति हीच मुक्ति होय, हा निश्चय आहे. शबरि ! तूं माझी भक्ति करितेस, ह्मणून मी तुजकडे प्राप्त झालों. ॥ ३१ ॥ आतां माझें दर्शन झाल्यामुळें तुला

स्त्रियो वा पुरुषस्यापि तिर्यग्योनिगतस्य[1] वा ॥ भक्तिः संजायते प्रेमलक्षणा शुभलक्षणे ॥ ॥२८॥ भक्तौ संजातमात्रायां[2] मत्तत्त्वानुभवस्तदा[3] ॥ ममानुभवसिद्धस्य मुक्तिस्तत्रैव जन्मनि ॥२९॥ स्यात्तस्मात्कारणं भक्तिर्मोक्षस्येति सुनिश्चितम् ॥ प्रथमं साधनं यस्य भवेत्तस्य क्रमेण तु ॥३०॥ भवेत्सर्वं ततो भक्तिर्मुक्तिरेव सुनिश्चितम् ॥ यस्मान्मद्भक्तियुक्ता त्वं ततोऽहं त्वामुपस्थितः[4] ॥३१॥ इतो मद्दर्शनान्मुक्तिस्तव नास्त्यत्र संशयः ॥

शुभलक्षणे, ( पू. ) ॥ प्रेमलक्षणा (मू.). ॥ २८ ॥ ( मू. ) मुक्तिः ॥ २९ ॥ ( पू. ) कारणं इति सुनिश्चितं. ॥ (मू.) ॥ ३० ॥ सर्वं भवेत्. ( मू. ) ॥ ३१ ॥ ( पू. ) मुक्तिः; अत्र संशयः न अस्ति ॥

१ पशुपक्षी ह्या योनींत पडलेल्या. २ झाल्याबरोबर. ३ माझ्या स्वरूपाचा साक्षात्कार. ४ उपस्थितः जवळ आलेला.

मुक्ति मिळणारच, ह्यांत संशय नाहीं. तुला माहीत असेल तर मला एवढें सांग कीं, माझी कमलनयना सीता ॥ ३२ ॥ आहे कोठें ? त्या माझ्या सुरूपसंपन्न प्रियेला कोणी नेलें ?" ॥ ३३ ॥ शबरी ह्मणाली :– 'रामा, तूं सृष्टिकर्ता सर्वज्ञ देव असल्यामुळें सर्व कांहीं जाणतोस. असें असून मला विचारीत आहेस; ह्याचें कारण, प्रभो, तूं लोकांप्रमाणें वर्तन करून दाखवीत आहेस, हें होय. ॥ ३४ ॥ ह्मणून, मी, सीता सांप्रत कोठें राहत आहे, तें तुला सांगत्यें. सीतेला रावणानें नेलें असून सध्यां ती लंकेमध्यें असते. ॥ ३५ ॥ रामा, येथें जवळच पंपानांवाचें एक सरोवर आहे व त्याला लागून ऋष्यमूकनामक मोठा पर्वत आहे. ॥३६॥

यदि जानासि मे ब्रूहि सीता कमललोचना ॥३२॥ कुत्रास्ते केन वा नीता प्रिया मे प्रियदर्शना ॥३३॥ शबर्युवाच ॥ देव जानासि सर्वज्ञ सर्वं त्वं विश्वभावन ॥ तथाऽपि पृच्छसे यन्मां लोकाननुसृतः प्रभो ॥३४॥ ततोऽहमभिधास्यामि सीता यत्राधुना स्थिता॥रावणेन हृता सीता लंकायां वर्तते ऽधुना॥३५॥ इतः समीपे रामास्ते पम्पानाम सरोवरम् ॥ ऋष्यमूकगिरिर्नाम तत्समीपे महानगः॥३६॥

(मू.) ॥३२॥ प्रियदर्शना मे प्रिया ( मू. ) ?' ॥ ३३ ॥ श० उ० – '(पू.) त्वं सर्वं जानासि; ॥ तथापि मां पृच्छसे; प्रभो, यत् [ त्वं ] ( मू. ). ॥ ३४ ॥ ( पू. ) [ तत् ] अभिधास्यामि. ॥ ( मू. ) वर्तते. ॥ ३५ ॥ राम, ( पू. ) आस्ते. ॥ तत्समीपे ( मू. ). ॥ ३६ ॥

१ प्रिय दर्शन जिचें, अशी. २ विश्वाची उत्पत्ति, पालन इत्यादि करणाऱ्या. ३ विचारितोस. ४ अनुसरलेला. ५ सांगेन. ६ मोठा पर्वत.

'सुग्रीवाशीं स-ख्य कर.'

वानरांचा राजा अतुलप्रतापी सुग्रीव अत्यंत भयभीत होत्साता चौघा मंत्र्यांना बरोबर घेऊन त्या पर्वतावर नेहमीं राहत असतो. ॥३७॥ त्याला आपल्या वाली नांवाच्या भावाचें फार भय आहे. - ह्या पर्वतावर मात्र त्याला ती धास्ती नाहीं; कारण, - वालीला एका ऋषीच्या भीतीमुळें तेथें येतां येत नाहीं. प्रभो, तूं तेथें जाऊन सुग्रीवाशीं सख्य कर. ह्मणजे तो तुझें सर्व कार्य पूर्ण करील. रघुनंदना, आतां मी तुझ्या अग्रभागीं अग्नींत प्रवेश करित्यें. ॥ ३८ ॥ ३९ ॥ हे राजाधिराजा रामचंद्रा, तूं साक्षात् षड्गुणैश्वर्यसंपन्न विष्णु होस. क्षणभर उभा राहा. मी ह्या शरीराचें दहन करून तुझ्या श्रेष्ठ पदास जात्यें.' ॥ ४० ॥ शबरीनें अशा प्रकारें रामाची प्रार्थना करून अग्नींत प्रवेश केला. व क्षणमात्रांत, ती अज्ञानामुळें उत्पन्न झालेल्या बंधनाचा निरास करून,

चतुर्भिर्मन्त्रिभिः[2] सार्धं सुग्रीवो वानराधिपः॥ भीतभीतः सदा तत्र तिष्ठत्यतुलविक्रमः ॥३७॥ वालिनश्च भयाद्भ्रातुस्तदगम्यमृषेर्भयात् ॥ वालिनस्तत्र गच्छ त्वं तेन सख्यं कुरु प्रभो ॥ ३८ ॥ सुग्रीवेण स सर्वं ते कार्यं संपादयिष्यति[4] ॥ अहमग्निं प्रवेक्ष्यामि[5] तवाग्रे रघुनन्दन॥३९॥मुहूर्तं तिष्ठ राजेन्द्र यावद्दग्ध्वा कलेवरम् ॥ यास्यामि भगवन् राम तव विष्णोः परं पदम् ॥ ४० ॥ इति रामं समामन्त्र्य[6] प्रविवेश हुताशनम्[7] ॥

भ्रातुः वालिनः भीतभीतः अतुलविक्रमः[1] वानराधिपः सुग्रीवः ( ३७ मू.). ॥ तत् ऋषेः भयात् वालिनः अगम्यं[3]; प्रभो, त्वं ( बा. ३८ उ. ) सुग्रीवेण सख्यं कुरु. रघुनन्दन, ( ३९ मू. ) प्रवेक्ष्यामि. ॥ ३७-३९ ॥ राजेन्द्र, भगवन्, (पू.) दग्ध्वा विष्णोः (मू.) यास्यामि,'॥४०॥शबरी (पू.)प्रविवेश; ॥

१ तुलना नाहीं पराक्रमाला ज्याच्या, असा.२ प्रधानांशीं.३ जाण्यास अयोग्य.४ पूर्ण करील.५ प्रवेश करीन.६ कळवून.७अग्नीप्रत.

रामाच्या प्रसादामुळें, अतिदुर्लभ अशा मोक्षास प्राप्त झाली. ॥ ४१ ॥ ( शंकर ह्मणतात :– पार्वति ! ) जगन्नाथ भक्तवत्सल प्रभु रामचंद्र प्रसन्न झाला असतां प्राण्याला दुर्लभ तें काय आहे ? पहा ! शबरी अधम कुलांत जन्मास आली असून देखील त्याच्या कृपेमुळें मुक्त झाली. ॥ ४२ ॥ - भिल्लिणीला जर मोक्ष मिळाला तर - मग उत्तम ब्राह्मणकुलांत जन्मलेले सदाचरणी पुरुष श्रीरामाचें ध्यान करूं लागले असतां त्यांना मोक्ष मिळेल, हें काय पुन्हां सांगितलें पाहिजे ? ह्या शबरीच्या उदाहरणावरून रामाची भक्ति हीच मुक्ति होय, एवढें सिद्ध झालें; - ह्यांत संशय नाहीं. - ॥ ४३ ॥ हे सुज्ञ जनहो ! ह्मणून - माझें तुह्माला इतकें

क्षणान्निर्धूय सकलमविद्याकृतबन्धनम्[1] ॥ रामप्रसादाच्छबरी मोक्षं प्रापातिदुर्लभम् ॥ ४१ ॥ किं दुर्लभं जगन्नाथे श्रीरामे भक्तवत्सले ॥ प्रसन्ने ऽधमजन्मापि[3] शबरी मुक्तिमाप सा ॥ ४२ ॥ किं पुनर्ब्राह्मणा मुख्याः पुण्याः श्रीरामचिन्तकाः ॥ मुक्तिं यान्तीति तद्भक्तिर्मुक्तिरेव न संशयः ॥ ४३ ॥ भक्तिर्मुक्तिविधायिनी भगवतः श्रीरामचन्द्रस्य हे लोकाः कामदुघांघ्रिपद्मयुगलं सेवध्वमत्युत्सुकाः ॥

( द्वि. ) निर्धूय ॥ ( मू. ) मोक्षं प्राप. ॥ ४१ ॥ ( पू. ) श्रीरामे प्रसन्ने [ सति ] किं दुर्लभं ? सा (मू.) ! ॥ ४२ ॥ ( पू. ) ब्राह्मणाः मुक्तिं यान्ति, इति किं पुनः [ वक्तव्यं ] ( मू. ). ॥ ४३ ॥ हे बुधाः लोकाः ! भगवतः श्रीरामचन्द्रस्य भक्तिः मुक्तिविधायिनी. [ तस्मात् यूयं ] अत्युत्सुकाः

१ अज्ञानानें केलेल्या बंधनास. २ दूर करून. ३ नीच कुलांत जन्मलेली. ४ पावली. ५ मुक्ति देणारी.

सांगणें आहे कीं, - षड्गुणैश्वर्यसंपन्न श्रीरामचंद्राची भक्ति मोक्षप्राप्तीचें साधन होय : ह्यासाठीं तुह्मी, अज्ञानाचे विविध खेळ जे मंत्रसाधनांचे खटाटोप, ते दूर झुगारून देऊन अत्यंत उत्सुकतेनें रामाची पुष्कळपणें सेवा करा. त्याचें चरणकमलयुगुल इच्छा पुरविणारी प्रत्यक्ष कामधेनुच आहे. तो श्यामसुंदर प्रभु मदनशत्रूच्या (शंकराच्या) हृदयांत नित्य वास करीत असतो. ॥ ४४ ॥ इति अरण्यकाण्डे दशमः सर्गः ॥ १० ॥

[1]नानाज्ञानविशेषमन्त्रविततिं त्यक्त्वा सुदूरे[2] भृशं रामं श्यामतनुं स्मरारिहृदये भान्तं भजध्वं बुधाः ॥ ४४ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अरण्यकाण्डे दशमः सर्गः ॥ १० ॥

[ सन्तः ] (मू.) [3]त्यक्त्वा [4]स्मरारिहृदये [5]भान्तं [6]श्यामतनुं [7]कामदुघांघ्रिपद्मयुगुलं रामं [8]भजध्वम्. ॥ ४४ ॥

॥ इति श्रीमदध्यात्मरामायणान्वये अरण्यकाण्डे दशमः सर्गः ॥ १० ॥ समाप्तं अरण्यकाण्डं ॥

---

१ अनेक प्रकारचा व अज्ञानमूलक संसाराचा आधार जो मंत्रांचा समूह, त्याला. २ फार लांब. ३ टाकून. ४ मदनाच्या शत्रूच्या ( शंकराच्या ) हृदयांत. ५ भासणाऱ्या. ६ श्यामवर्ण शरीर ज्याचें, अशा. ७ इच्छा पुरविणारें चरणकमलद्वय ज्याचें अशा. ८ भजा.

॥ इति अरण्यकाण्डः समाप्तः ॥

